

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**

**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**

संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.

२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.

३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.

४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्स्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ४२ । अंक ३ । डिसेंबर १९८८
किमत ६ रुपये वार्षिक वर्गणी ४५ रुपये
आजीव सदस्य वर्गणी–
व्यक्ती : रु. ३००/– संस्था : रु. ५००/–
या अंकातील लेखांत व्यक्त झालेल्या मतांशी संपादक सहमत असतीलच, असे नाही.





---

**संपादकीय पत्रव्यवहार :**
मे. पुं. रेगे,
संपादक, ‘नवभारत’ मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई–४१२ ८०३ (जि. सातारा)

---

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
श्री. ग. दीक्षित,
व्यवस्थापक, ‘नवभारत’ मासिक,
द्वारा : दी प्राज्ञ प्रेस, वाई–४१२ ८०३.
(जि. सातारा)

---

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या नियतकालिकासाठी ‘स्थायी निधी’ निर्माण केला आहे आणि अनुदानही दिले आहे.

अनुक्रमणिका








# नवभारत

**डिसेंबर १९८८**

## अ नु क्र म





## लेखक-परिचय

■ **सी. पं. खेर** : अर्थशास्त्राचे अभ्यासक; निवास : गांधी चौक, धारवाड–५८० ००१ (कर्नाटक राज्य) ■ **भाऊ धर्माधिकारी** : स्वातंत्र्याच्या आंदोलनातील एक ज्येष्ठ विधायक कार्यकर्ते व विचारवंत; निवास : 'निवारा', ६०/१३, भारती निवास सह. सोसायटी, एरंडवणे, पुणे–४११ ००४. ■ **नीलम हातेकर** : किसन वीर महाविद्यालय, वाई येथे मराठीच्या प्राध्यापिका, वाई–४१२ ८०३. ■ **अशोक नारायण ठाकूर** : मराठी विश्वकोशात भूविज्ञान, धातुविज्ञान, वातावरणविज्ञान इत्यादी विषयांचे संपादक, वाई–४१२ ८०३.



## संपादकीय

### राष्ट्रीय एकात्मतेला वाढते धोके

भारतीय संविधानाप्रमाणे गेली चाळीस वर्षे भारतीय संसदीय लोकशाही ही मोठ्या सामर्थ्यानिशी जगातील एक श्रेष्ठ लोकशाही म्हणून विराजमान झाली आहे. पश्चिमी लोकशाही नेत्यांना हा एक चमत्कार वाटतो. लोकशाही जीवनमूल्यांची परंपरा पश्चिमी देशांत अनेक राजकीय क्रांत्यांमधून विकसित झाली आहे. ती मूल्ये पौर्वात्य देशांमध्ये इतक्या सामर्थ्यानिशी अभिव्यक्त होत आहेत याचेच पश्चिमी विचारवंतांना आश्चर्य वाटते.

परंतु अशी कोणतीही श्रेष्ठ राजकीय व्यवस्था विनधोकपणे राहू शकत नाही. प्रत्येक उच्च दर्जाच्या सुव्यवस्थेच्या आत-बाहेर गोंधळ आणि अराजकता निर्माण करणाऱ्या शक्ती वावरत असतातच. सुव्यवस्थेच्या शेजारी अव्यवस्था निर्माण करणाऱ्या शक्ती राहतात, हा आधुनिक भौतिक शास्त्राचा महत्त्वाचा सिद्धांत स्थापन झाला आहे. या अव्यवस्थेला एन्ट्रपी म्हणतात. ही अव्यवस्था अनेक रूपांनी सुव्यवस्थेच्या अंतर्बाह्य जीवनात प्रकट होत असते. भारताची विशाल संसदीय लोकशाही अशाच दुरवस्था निर्माण करणाऱ्या शक्तींनी घेरली जात आहे आणि या दुरवस्थेच्या शक्ती मोठी आकर्षक अशी नावे धारण करीत आहेत; आकर्षक शब्दावल्यांच्या योगे त्या व्यक्त होत आहेत.

उदाहरणार्थ, हिंदुत्व म्हणजे भारतीय राष्ट्रीयत्व. भारताचे एकराष्ट्रीयत्व गेली दोनशे वर्षे विकसित होत आहे. त्यात ध्येयवादी उच्च आदर्शांचा साक्षात्कार होत आहे. नवा आधुनिक भारत निर्माण व्हावा म्हणून अनेक संस्था निर्माण करणारे नेते क्रमाने उदयास आले आहेत. धार्मिक आणि धर्मनिरपेक्ष अशा दोन्ही दृष्टिकोणांतून भारतीय संस्कृतीला नव्या विश्वव्यापी मानवी संस्कृतीशी सुसंगत असा आकृतिबंध देणारे नेते निर्माण झाले आहेत. राजा राममोहन रॉय, महादेव गोविंद रानडे, जोतिराव फुले, गोपाळ कृष्ण गोखले, लोकमान्य बाळ गंगाधर टिळक, रवींद्रनाथ ठाकूर, पंडित जवाहरलाल नेहरू, बाबासाहेब आंबेडकर, महात्मा मोहनदास करमचंद गांधी आणि या महापुरुषांना सहकारी म्हणून लाभलेले आणि त्यांच्या विचारांशी सहमत झालेले कवी, शास्त्रज्ञ, अगणित स्वातंत्र्यसैनिक हेही लक्षात घ्यावे लागतात. त्यांचे राष्ट्रीयत्व हे विश्वमानवतेशी सुसंगत आणि समरस झालेले असे होते. अलीकडे या राष्ट्रीयत्वाला धोका निर्माण करणारा हिंदुत्वाचा अहंकार व्यक्त करणाऱ्या संघटना वाढीस लागल्या आहेत. हा परंपरागत संस्कृतीतील खालच्या पातळीवरील त्या त्या मर्यादित देशकालाशी सुसंगत परंतु आजच्या नव्या विज्ञाननिष्ठ मानवी संस्कृतीशी विसंगत व त्या संस्कृतीच्या विकासाचा कोंडमारा करणारा असा अहंकार आहे. हा अहंकार भारतीय राजकारणात विजयी झाला तर बेबंदशाही निर्माण करील आणि त्यातून उजवी हुकुमशाहीही निर्माण होऊ शकते. या परंपरागत हिंदू संस्कृतीतील खालच्या स्तरावरील हीन दर्जाच्या अंधश्रद्धांच्या पाठिंब्याने फोफावणारा








हा अहंकार आहे. डिसेंबर १९८८ च्या अखेरच्या आठवड्यात पुणे येथे या अहंकाराचा प्रचंड रूपाने आविष्कार झाला आहे. तो हिंदू संस्कृतीच्या उच्च जीवनमूल्यांशी विसंगत आहे. पाच हजार वर्षे टिकलेल्या संस्कृतीच्या उदात्त जीवनमूल्यांशी अत्यंत विसंगत आहे, हिंदू संस्कृतीचे क्लैब्य वाढवील.

दुसरा धोका मार्क्सवादी पक्षातून निर्माण झाला आहे. नुकतेच मार्क्सवादी कम्युनिस्ट पक्षाचे अधिवेशन भरले होते. त्या अधिवेशनात जे वैचारिक मंथन झाले, त्यात भारताची एकराष्ट्रीयता अमान्य करण्यात आली. भारत हा अनेक राष्ट्रांचा समुदाय, असा विचार मांडण्यात आला. त्याचप्रमाणे भारताची लोकशाही संसदीय राष्ट्रीय राज्य नसून ती भांडवलशाही–जमीनदारशाहीच आहे, असे विवरण करण्यात आले. हे मार्क्सवादी खरेखुरे मार्क्सवादी नसून हे अर्धेकच्चे मार्क्सवादी आहेत. ई. एम्. एस्. नंबुदिरीपाद हे त्या पक्षाचे मुख्य सचिव आहेत. या पक्षाचा अखिल भारतीय विस्तार होण्यास भारताची वर्तमान संसदीय लोकशाही उपयोगी पडू शकेल. हिंदुत्व राष्ट्रवाद्यांचा प्रभाव वाढू लागला आहे; प्रादेशिक पक्ष प्रदेश-राज्यांवर सत्ता गाजवू लागले आहेत.

हिंदुत्व राष्ट्रवादी आणि निरनिराळे प्रादेशिक पक्ष यांच्या उठावाने मध्यवर्ती केंद्रसत्ता धोक्यात आली, तर संसदीय लोकशाहीने निर्माण केलेले संघटना स्वातंत्र्य व प्रचार स्वातंत्र्य नष्ट होईल, आणि मार्क्सवाद्यांनी पश्चिम बंगाल, केरळ या दोन राज्यांत आपले बस्तान बसविले आहे, ते बस्तानही टिकाव धरू शकणार नाही. वर्तमान केंद्रसत्तेच्या विरुद्ध मार्क्सवादी पक्षाच्या अनेक तक्रारी आहेत व त्या खऱ्याही आहेत, परंतु भारताच्या एकंदरीत राष्ट्रीयत्वाबद्दलची या मार्क्सवाद्यांची वास्तववादापासून दूर गेलेली मीमांसा त्यांना सावरून धरू शकणार नाही, हे मार्क्सवादी इतिहासाकडे पाठ करून भारतीय राष्ट्रीयत्वाची मीमांसा करीत आहेत. म्हणून ते खरे मार्क्सवादीच नाहीत, मार्क्सवादी विचारसरणी ही इतिहासाधिष्ठित विचारसरणी आहे, आणि इतिहासाधिष्ठित विचारसरणी धरली म्हणजे भारताचे संसदीय लोकशाही संविधान हे मार्क्सवादाच्या परिभाषेप्रमाणे 'बूर्झ्वा डेमॉक्रसी' (भांडवलदारी लोकशाही) या शब्दावलीनेच नीट व्यक्त होऊ शकते.



## वर्गणीदारांसाठी सूचना

- 'नवभारता'ची वार्षिक वर्गणी ऑक्टोबर १९८६ पासून रु. ४५/– करण्यात आली होती. अजूनही वर्गणी पाठविताना काही वर्गणीदार जुन्या दरानेच वर्गणी पाठविताना आढळतात.
- वर्गणी पाठविताना वर्गणीदार क्रमांक व संपूर्ण पत्ता लिहिणे आवश्यक आहे. वर्गणीदार क्रमांक अंकाच्या वेष्टनावर छापलेला असतो.
- वर्गणी मनिऑर्डरने वा ड्राफ्टने पाठवावी. चेकने पाठवताना वटणावळीसाठी रु. ५·५० जादा पाठवावे.

— व्यवस्थापक

# केंद्र-राज्य संबंध (१)

## सी. पं. खेर

– १ –

केंद्रात आणि राज्यांतून भिन्नपक्षीय सरकारे आल्यापासून केंद्र-राज्य संबंधात रस्सीखेच आणि सतत कमालीचे तणाव निर्माण केले जात आहेत. तत्पूर्वी म्हणजे एकपक्षीय सरकारे असताना केंद्रसत्ता मूकपणे मान्य केली जात होती असे नव्हे. पण हे मतभेद पक्षीय पातळीवर देदीप्यमान पुढाऱ्यांच्या प्रभावाखाली म्हणजे घटनाबाह्य पद्धतीने मिटवले जात. त्याला संघर्षाचे स्वरूप येत नसे. पण भिन्न विरोधी पक्ष नेहमीच संघर्षाचा पवित्रा घेत आले. हा संघर्ष मुळात राजकीय, भिन्न व्यक्तिमत्त्वांचा; पण त्याला तात्त्विक रंग चढवला गेला. या संघर्षाचे मूळ भारतीय राज्यघटनेत आहे असा घणाघाती प्रचार सुरू झाला. यातून प्रथम केंद्राने 'प्रशासकीय सुधारणा समिती' (१९६७) नेमली. या समितीने नेमलेल्या अभ्यासगटाने, "घटनेचा मूलभूत ढाचा प्रशासकीय हेतुपूर्तीसाठी अपुरा असल्याचे आमच्या अन्वेषणात आम्हास कुठेच आढळले नाही... घटनेच्या सातव्या परिशिष्टातील अधिकाराची विषयवार वाटणी आमच्या मते प्रशंसनीयपणे योग्य आहे..." असे म्हटले आहे. या भलावणीवर नाराजून तामिळनाडू सरकारने डॉ. पी. व्ही. राजमन्नार यांच्या अध्यक्षतेखाली सवत्या सुभ्यासारखी, घटनेच्या अभ्यासासाठी वेगळी समिती नेमली (१९७१). प्रशासकीय समितीच्या आणि राजमन्नार समितीच्या मूलभूत दृष्टिकोणांतच भेद आहेत. भारतीय संविधानाने केंद्र सरकार नेहमीच प्रबळ राहीलसे पाहिले आहे. तर संरक्षण, परदेशीय संबंध, चलन आणि सामान्य संचारण एवढ्यापुरते केंद्राचे अधिकार मर्यादित ठेवावेत व इतर सर्व अधिकार राज्यांना सोपवावेत असा विरोधी पक्षांचा सूर आहे. "केंद्र सबळ हवे" असे वरवर म्हणत-म्हणतच केंद्राकडील आजचे अन्य अधिकार काढून घ्यावेत असे त्यांचे प्रतिपादन आहे. शिरोमणी अकाली दलाने १९७३ च्या ऑक्टोबरात आनंदपूरसाहेब येथे तसा ठरावच केला;[१] त्याचा पाठपुरावा करायचा विडा उचलला. यातून शीख राजकारणाने सशस्त्र लढ्याचे कसे स्वरूप घेतले हे सर्वज्ञात आहे.



आनंदपूरसाहेब ठरावाबाबत अकाली दलाने अनेक कोलांट्या उड्या घेतल्या. खलिस्तान हवे इथपासून संघराज्याच्या परंपरागत तत्त्वानुसार भारतीय संविधान बदलावे व राज्यांना अधिक स्वायत्तता मिळावी असा या ठरावाचा अर्थ आहे असे सांगितले गेले. अकाली दलाला चुचकारण्यातून भारत सरकारने संविधानाची तपासणी व परीक्षण करण्यासाठी मार्च १९८३ मध्ये एक समिती नेमली. अशा समितीचा अध्यक्ष शीखधर्मीय असावा अशीही अकालींची मागणी होती. ती मान्य करून निवृत्त न्यायाधीश आर. एस. सरकारिया यांना या समितीचे अध्यक्ष नेमले. श्री. बी. शिवरामन व अर्थतज्ज्ञ एस. आर. सेन हे या समितीचे आणखी दोन सदस्य होते. या समितीचा अहवाल नुकताच उपलब्ध झाला आहे (ऑगस्ट १९८८). या अहवालाची चर्चा दोन लेखांतून करावयाचे योजले आहे. केंद्र-राज्य आर्थिक संबंधाची चर्चा नंतरच्या लेखात येणार असून अन्य काही प्रमुख बाबी या लेखात समाविष्ट करण्याचे योजिले आहे.

– २ –

भारतीय संविधानाने संघराज्यपद्धती स्वीकारली आहे. परंतु ती परंपरागत पद्धती नव्हे. परंपरागत पद्धत म्हणजे अमेरिकेची. ती पद्धत जे आदर्श मानतात ते भारतीय संविधानाने स्वीकारलेली पद्धत चुकीची आहे असे समजतात. अशा वेळी भारतीय परिस्थिती अमेरिकेहून भिन्न होती याकडे ते काणाडोळा करतात. अमेरिकेत मुळातच राज्ये स्वायत्त व स्वतंत्र होती. त्यांना निरंकुश सत्ता होती. त्यांतील काही त्यांनी केंद्राला बहाल केली व संघराज्य निर्माण केले. केंद्रसत्ता स्थापन करायला आणि राज्यांना संघराज्यातून फुटून बाहेर पडायचा कोणताही अधिकार नाही हे सिद्ध करायला यादवी

अनुक्रमणिका

युद्ध करावे लागले. तिथे व्यक्तींना दुहेरी नागरिकत्व आहे– एक राज्याचे, दुसरे संघराज्याचे. भारतात प्रांतांना मुळात कोणतेही अधिकार नव्हते. केंद्र सरकार (ब्रिटिश) सार्वभौम होते. आजचे राज्याचे अधिकार भारतीय संविधानाने निर्माण केलेले आहेत. तेव्हा प्रांतांनी आपले अधिकार केंद्राला सुपूर्त करण्याचा प्रश्न उद्भवत नाही. तसेच भारतात एकच नागरिकत्व आहे. राज्यांचे वेगळे असे नागरिकत्व नाही. घटना सांगते, "भारतातील" [ कर्नाटकातील किंवा महाराष्ट्रातील नव्हे ] "आम्ही लोकांनी भारत हे सार्वभौम, लोकशाही, प्रजासत्ताक राज्य निर्माण करावयाचे ठरविले आहे." प्रांतांनी आपले काही अधिकार सुपूर्त करून संघराज्य निर्माण केले आहे असे घटना सांगत नाही. किंबहुना 'संघराज्य' हा शब्द घटनेत नसून डोळसपणे तो टाळलेला आहे. सामान्य परिस्थितीत संघराज्याप्रमाणे घटना कार्य करणार आहे तर संकटकाळी ती एकात्म आहे.[३] त्यातून राज्यांना फुटुन निघण्याचा मुळी अधिकारच नाही. हे संघराज्य एकसंघ आहे कारण ते अविनाशी आहे.

तामिळनाडू राज्याला भारताचे एकसंघत्व नको होते. म्हणून आदर्श, सांप्रदायिक संघराज्यानुसार भारतीय संविधान बदलावे असे राजमन्नार समितीने प्रतिपादिले. भारताची अखंडता त्यांना मान्य आहे. परंतु त्याबरोबरच राज्यांची स्वायत्तता त्यांना हवी आहे. भारतीय परिस्थितीत भारत अखंड राहावयाचा असेल तर केंद्र राजकीय, प्रशासकीय व आर्थिक दृष्टचा प्रबळ राहणे आवश्यक आहे; तसेच स्वायत्ततेतून स्वतंत्र होण्याची प्रवृत्ती नेहमीच बळावत आली आहे हा मौर्यांपासून तो मराठ्यांपर्यंतचा भारतीय इतिहास ते विसरतात. आपल्यात फुटीर वृत्ती आहेच व ती केव्हा उसळी मारेल हे सांगता येत नाही. सरकारिया समितीस तेलगू जाती विमुक्ती संघ व शिरोमणी अकाली दल यांनी दिलेली विज्ञापने यांची आजही बोलकी उदाहरणे आहेत. तेलगू जाती विमुक्ती संघाने राष्ट्राच्या व्याख्येपासून सुरुवात केली असून बहुसंख्याकांची एक भाषा, एक संस्कृती, सवयी व संप्रदाय हा राष्ट्राचा कणा आहे; आणि म्हणून भारत हा अनेक राष्ट्रांचा उपखंड आहे व तो तसा घटनेनेही राहिला पाहिजे असे प्रतिपादिले आहे.[४] म्हणजे भारतात निर्माण झालेली भाषिक राज्ये ही प्रशासकीय सोयीसाठी नसून ती स्वायत्त राष्ट्रेच आहेत व ती तशी त्यांना निर्माण व्हायला हवी आहेत.[५] या विचाराचा पुनरुच्चार त्या वेळच्या पंजाब सरकारने केला आहे.[६] शिरोमणी अकाली दलाने स्वातंत्र्यापूर्वी काँग्रेसचे घटक राज्यांना पुष्कळशी स्वायत्तता ठेवणारे संघराज्य निर्माण करण्याचे ध्येय होते व ते ध्येय घटनेच्या मसूद्याने डावललेले आहे आणि म्हणून त्या मसूद्याच्या स्वीकृतीसाठी स्वाक्षरी करण्यास अकाली दलाने नकार दिला याची जाणीव दिलेली आहे. आम्ही स्वाक्षरी केली नाही म्हणून ती आम्ही मानीत नाही असेच अकाली दलाला सुचवावयाचे आहे असे दिसते. काँग्रेसची अशा संघराज्याची कल्पना मुस्लिम लीगचे सहकार्य मिळावे यासाठी होती. परंतु धर्मांधता व ब्रिटिश नीती यापायी देशाचे विभाजन जाहीर झाल्यावर काँग्रेसने आपला हा विचार पूर्णपणे बदलला; फूट टाळण्यासाठी केंद्रसत्ता दुर्बळ न ठेवता प्रबळ राखणे हिताचे असल्याचा निर्धार जाहीर केला व तोच संविधानात व्यक्त झाला आहे. आपली लोकशाही बाल्यावस्थेत आहे व भारतीय राष्ट्रीयत्व घडण्याच्या मार्गावर आहे. अशा वेळी केंद्र प्रबळ ठेवणे अपरिहार्य आहे. प्रबळ केंद्रच भारताची एकात्मता, व सार्वभौमता राखू शकेल असा भारतीय इतिहासाचा निर्वाळा आहे. धर्म, भाषा, सीमा व जात यांबद्दलच्या जराशाही प्रेरणेने प्रक्षोभ उसळतो, फुटीर वृत्ती बळावते व देशाच्या एकात्मतेला बाधा येते हा आपला नेहमीचा अनुभव आहे. म्हणूनच संविधान केंद्रकर्षी सत्तेचे हवे व ते तसे आहे. ते आदर्श, सांप्रदायिक संघराज्य नसेल, ते संघराज्यवत् (Quasi federal) असेल किंवा एकात्मही असेल किंवा अशा कोणत्याच व्याख्येत बसणारे नसेल. व्याख्येबरहुकूम संविधान स्थापावयाचे नसून क्रांतिकारक असे सामाजिक आणि आर्थिक बदल घडवून आणण्यासाठी आणि भारताचे स्वातंत्र्य व एकात्मता अबाधित राखण्यासाठी संविधान हवे आहे व ते तसे आहे हे कालौघात सिद्ध झालेले आहे हे दृढपणे ध्यानात बाळगावयास हवे.

आर्थिक प्रगतीचा सर्वत्र सहजकल केंद्रीकरणाकडे आहे. "राष्ट्रीय हेतू", "राष्ट्रीय दिन" यांकरिताही सत्ता केंद्राकडे झुकत आहे. अमेरिकेसारख्या अभिजात संघराज्यात १९६० नंतर अशा केंद्रीकरणाला गती मिळाली आहे. मोठाले उद्योग, मजूर, कृषी, संचारण, वाहतूक, बँकिंग, रोखे, पर्यावरण, आरोग्य व सुरक्षा, उपभोक्त्यांचे संरक्षण, व सामाजिक समता अशा विविध



अनुक्रमणिका

क्षेत्रांत नियामक सत्ता केंद्राकडे आलेली आहे. अनुदानाच्या अटीतून अप्रत्यक्षपणेदेखील केंद्राची अधिसत्ता चालते.[६] कॅनडा, ऑस्ट्रेलिया इ. देशांतूनही व्यवहारात घटनेच्या पलीकडे जाऊन प्रत्यक्षात सहकारी संघराज्ये बनली आहेत. म्हणजे संघराज्याचा अभिजातपणा म्हणून जो सांगितला जातो तो आता नाहीसा झाला आहे. तेव्हा भारतात सत्ता केंद्राकर्षी राहिल्याने काही चुकलेले नाही. नव्हे, भारतीय परिस्थितीत ती अपरिहार्य आहे.

– ३ –

सत्ता केंद्रकर्षी असावी हा विचार मान्य असणाऱ्या व भारतीय संविधानाचे अन्वेषण करणाऱ्या आजवरच्या सगळ्या समित्यांनी भारतीय संविधानाचा ढाचा योग्य असून तो बदलणे हितावह व आवश्यक नसल्याचेच सांगितलेले आहे. भारतीय संविधान लिखित आहे व जगातील सर्व लिखित संविधानांपेक्षा ते जास्त सविस्तरपणे लिहिले गेले आहे असे म्हटले जाते. लिखित संविधान साचेबंद बनण्याचा व त्यातून कायदेबाजी वाढण्याचा धोका असतो. त्यामुळे अनेक बाबी अध्याहृत व विवेकाधीन ठेवाव्या लागतात. संविधानात लवचीकपणा राखण्याचा, बदलत्या परिस्थितीनुसार बदल घडवून आणायला वाव राखण्याचा तो मार्ग आहे. पण ज्या बाबी लिखित नाहीत त्या बाबतींत काही चांगले संकेत निर्माण करावयास हवेत. दुर्दैवाने असे संकेत निर्माण केले गेले नाहीत. प्रसंगपरवश तात्कालिक जुजबी उपाय योजून वेळ मारून नेली गेली. यामुळे घटनेत तरतूद असूनही आवश्यक अशा यंत्रणा निर्माण केल्या गेल्या नाहीत. या यंत्रणांचा अभाव हे केंद्र-राज्य संघर्ष बळावण्याचे कारण ठरले आहे.. त्यापायी आता काही वैधानिक तरतुदी करणे आवश्यक बनले आहे असे सरकारिया समितीला वाटले आहे व तिने तशा सूचना केलेल्या आहेत.

केंद्र व राज्ये हे तुटक, सुटे घटक नाहीत. परस्परांशिवाय त्यांना वेगळे अस्तित्व नाही. भारतीय संविधानात अशा अनेक तरतुदी आहेत, की ज्यांमुळे परस्परांचे सहकार्य अपरिहार्य आहे. उदाहरणार्थ, केंद्रीय कायद्यांची अंमलबजावणी राज्ययंत्रणेद्वारा करावयाची आहे. नाहीतर केंद्राचे व राज्याचे असे दुहेरी प्रशासन निर्माण करावे लागले असते. ते संविधानाने टाळले आहे. केंद्र व राज्यांच्या अधिकारकक्षा संविधानाच्या सातव्या परिशिष्टात नमूद आहेत. यांतील काही बाबी ( उदा., उद्योगधंदे, व्यापार ) अशा आहेत, की त्यांतील काही अंगे केंद्राच्या अखत्यारीत तर काही राज्यांच्या, काही बाबींवर दोघांचे ( केंद्राची अधिसत्ता राखून ) समवर्ती अधिकार आहेत. म्हणूनच सरकारिया समितीने भारतीय संविधानाचे सूत्र सहकारी संघराज्याचे आहे असे पुनःपुन्हा सांगितले आहे.

हे सहकार्य परस्परांवरील विश्वास, भरवसा, आदर, सलोखा, आस्था आणि परस्परांना समजून घेण्याची वृत्ती यांशिवाय शक्य नाही. एकाने खोडी काढीत राहावे व दुसऱ्याने कुरघोडी केल्यास बोंबलत सुटावे हे सहकार्याचे लक्षण नव्हे. एकंदर देशाचा विचार न करता आपल्या क्षेत्राचा, धर्माचा, भाषेचा, जातीचा, आपल्याच भूमिपुत्रांचा विचार करीत राहिल्यास विघटनेशिवाय कोणतेच फळ मिळावयाचे नाही. पूर्वी आपण कोणी सार्वभौम नव्हतो, जे स्वातंत्र्य आहे, जे अधिकार आहेत ते या घटनेने दिलेले आहेत, तेव्हा या घटनेच्या चौकटीत राहून आपला सन्मान राहावयाचा आहे ही जाणीव सतत बाळगल्याशिवाय आपले अस्तित्व टिकावयाचे नाही. यासाठी सरकारिया समितीच्या शब्दांत "राजकीय नीतिमत्तेची" कास धरावयास हवी. राजकीय नीतिमत्तेमधूनच प्रशासकीय, वैधानिक शिस्त निर्माण होऊ शकेल. अन्यथा संविधानाने आणलेली क्रांती कल्याणप्रद ठरावयाची नाही. म्हणून घटनेबद्दल आदर बाळगून घटनेतील तरतुदींचा आश्रय घेऊन, घटनात्मक मार्गानेच सहकारी संघराज्य कार्यान्वित राखणे अगत्याचे आहे.

– ४ –

संविधानाच्या सातव्या परिशिष्टानुसार यादी नं. १ मधील बाबी केंद्राच्या अखत्यारीत, यादी नं. २ राज्यांच्या अखत्यारीत व यादी नं. ३ ही समवर्ती म्हणजे दोघांचीही अधिसत्ता (त्या त्या अंगापुरती) चालू शकणारी आहे. अधिकाराच्या बाबींच्या या याद्या काटेकोर करण्याचा प्रयत्न असला, तरी अनवधानाने किंवा लेखनमर्यादेमुळे काही बाबी परस्परव्याप्त राहण्याची शक्यता नाकारता येत नाही. तसेच एकाच बाबीत राज्ये व केंद्र यांना आपला अधिकार चालविण्याची इच्छा असणे अशक्य नाही. अशा वेळी घटनेने केंद्राचा कायदा प्रभावी ठरवला असून राज्याचा कायदा अवैध राहील असे सांगितलेले आहे. राज्यांचे कायदे केंद्राच्या कायद्यांशी

जेवढ्या अंगांपुरते वा उद्देशांपुरते बाधक ठरतील तेवढ्या अंगा-उद्देशांपुरता राज्याचा कायदा अवैध राहील. याला "बाधकतेचा नियम" (Repugnancy Rule) असे म्हटले आहे. या नियमाच्या अंमलबजावणी-साठी दोन अटी पुऱ्या व्हायला हव्यात.[७]

१. यादी नं. ३ मधील बाबींवरील केंद्र व राज्याचे कायदे परस्परविरोधी असायला हवेत. एक कायदा पाळताना दुसऱ्याचे उल्लंघन होत असावे.

किंवा

२. समवर्ती यादीतील एखाद्या विशिष्ट बाबी-संबंधात परिपूर्ण असा कायदा करावयाचा केंद्राचा उद्देश असावा.

'बाधकतेचा नियम' गाळावा अशी काही राज्यांची सूचना आहे. उलट, केंद्राची अशी अधिसत्ता तर काढून घ्यावीच पण शिवाय केंद्राच्या अखत्यारीतील विषयावर राज्यांना कायदेशीर अधिकार असावा असे काही राज्यांना वाटते. ही राज्यांची मागणी गैरलागू, संघराज्याच्या तत्त्वाशी विसंगत असून सबंध हे अंशा-हून मोठे असते या सामान्य सत्याशी विरोधी आहे असे सरकारिया समितीने सांगितले आहे. म्हणून केंद्राचे प्राबल्य प्रस्थापिणाऱ्या व केंद्राच्या अधिकारास बाधा येऊ न देणाऱ्या संविधानाच्या कलम २४६ व २५४ यांत कोणताही बदल करण्यास तिने नकार दिला आहे.

यादीत प्रविष्ट नसलेले सगळे "उर्वरित" अधि-कार कलम २४८ व यादी नं. १ मधील ९७ व्या बाबीनुसार केंद्राच्या अखत्यारीत सोपविलेले आहेत. परंतु हा अधिकार राज्यांना मिळावा किंवा तो समवर्ती यादीत समाविष्ट करावा असा काही राज्यांनी दावा मांडला आहे. या बाबतीत सरकारिया समितीने पुढील-प्रमाणे प्रतिवाद केलेला आहे :

१. केंद्र प्रबळ राहावे हा यामागे हेतू आहे.

२. राज्यांना आधी कोणतेही अधिकार नव्हते. तेव्हा उर्वरित अधिकार त्यांना सोपवायचा प्रश्न येत नाही.

३. उर्वरित अधिकाराखाली केंद्राने केवळ नऊ कायदे केले. यांपैकी एक, राज्यांनी अवैधपणे कर गोळा केला त्याला मान्यता देण्यासाठी होता. दुसरा, पूर्वीच्या 'क' राज्याच्या विधानसभेच्या कार्यवाहीस मान्यता देणारा होता. तिसरा, एक सार्वजनिक संस्था ताब्यात घेण्यासाठी होता. चौथा, व्यापारी हेतूसाठी राष्ट्रीय बोधचिन्हांचा वापर करण्यास मनाई करणारा आहे. उरलेले पाच कायदे करविषयक असून त्यांपैकी दोन निरसित (Repealed) केले गेले आहेत. बाकीचे तीन करविषयक कायदे उर्वरित अधिकाराखाली असले, तरी केंद्राच्या अखत्यारीत येतात.

करविषयक कोणत्याही बाबी समवर्ती यादीत नाहीत हे ध्यानात घेतले पाहिजे. नं. २ यादीत नसलेले कराधानाचे अधिकार कलम २४८ (२) प्रमाणेही केंद्राच्या अधीन आहेत. ते तसे यायला हवेत. कारण करविषयक बाब ही एकहाती म्हणजे कराधान टाळ-णारी असावयास हवी.

कराधानाचे उर्वरित अधिकार केंद्राचे आहेत. ते अधिकार वगळल्यास इतर उर्वरित अधिकार केवळ केंद्राकडे का राहावेत असा प्रश्न उरतो. असे (करा-धानाचे वगळून) उर्वरित अधिकार समवर्ती यादीत समाविष्ट करावेत अशी सरकारिया समितीची शिफा-रस आहे. अंतिम अधिकार नेहमीच केंद्राचा आहे. पण तोवर त्या बाबतीत राज्यांचाही अधिकार मान्य करा-यला हरकत नसावी.

केंद्राचे उर्वरित अधिकार कधीच अमर्यादित नव्हते हे इथे लक्षात घ्यायला हवे. यादी नं. १ मधील ९७ व्या बाबीचा आश्रय घेण्यापूर्वी प्रस्तावित विधेयकाचा विषय इतर दोन यादींत आलेला नसावा. यादी नं. २ मध्ये तो असेल, तर ती 'उर्वरित' बाब ठरत नाही. आणि नं. ३ मध्ये तो येत असेल, तर ९७ व्या बाबीचा आश्रय आवश्यक ठरत नाही. ९७ व्या बाबीचा आधार हा पहिला नसून शेवटचा आहे. आणि हा आधार घेत असताना या तिन्ही यादींतील बाबींना व्यापक अर्थ लावला पाहिजे असे सर्वोच्च न्यायालयाने स्पष्ट केलेले आहे.[८]

— ५ —

(i) संविधानाच्या ७ व्या परिशिष्टातील यादी नं. १ मध्ये केंद्राच्या अधीन असलेले विषय नमूद केलेले आहेत. यांत एकूण ९९ बाबी आहेत. इतक्या बाबी केंद्राकडे असायला राज्यांचा विरोध आहे. त्यांच्या मते संरक्षण, परदेशीय संबंध, चलन आणि सामान्य संचा-रण एवढ्यांपुरते केंद्राचे अधिकार मर्यादित असावेत. गंमत अशी, की यात कराधानाचा विषय ते नमूद करीत नाहीत. कराधानाचे स्वतंत्र अधिकार असल्या-

अनुक्रमणिका






शिवाय संघराज्य टिकावयाचे नाही याबद्दल ते मौन पाळतात.

परंतु, एवढे चार विषय घेतले, तरी त्याला संलग्न अशा ४३ बाबी येतात असे सरकारिया समितीने स्पष्ट केले आहे. शिवाय राष्ट्रीय अस्तित्व टिकविण्यास लागणाऱ्या ( अशा १५ बाबी ), तसेच राष्ट्रीय परिमाण असणाऱ्या, सर्वत्र एक धोरण व समान प्रशासन आवश्यक असणाऱ्या ( अशा १२ बाबी ), व कराधानाच्या [ अशा १३ बाबी आहेत; यांतून राज्यांना वाटा मिळतो व अनुदान दिले जाते. ] बाबी लक्षात घेतल्यास वादग्रस्त अशा सोळा बाबी उरतात. या बाबी केंद्राच्या अधीन असणे कसे आवश्यक आहे हे बाबवार चर्चा करून सरकारिया समितीने दाखवून दिलेले आहे. त्या सर्वांचा उल्लेख इथे आवश्यक नाही. भावप्रक्षोभक अशा चार बाबींचा तेवढा उल्लेख करतो. त्या म्हणजे १. उद्योग, २. आंतरराज्य नद्यांचे नियंत्रण, विकास व पाणीवाटप, ३. शिक्षण, व ४. अन्नधान्य-नियंत्रण व वाटप.

(ii) यादी नं. १ मध्ये ७ वी बाब (संरक्षणासाठी किंवा युद्ध चालविण्यासाठी लागणारे उद्योग), ५२ वी बाब (लोकसभेने सार्वजनिक हिताचे म्हणून जाहीर केलेले उद्योग) या केंद्राधीन आहेत तर उरलेले उद्योग यादी नं. २ मध्ये (२४ वी बाब) राज्यांच्या अखत्यारीत ठेवलेले आहेत. ५२ व्या बाबीखाली केंद्र सरकारने १९५१ त "उद्योगविकास व नियमन" चा कायदा केला व त्याखाली पहिल्या परिशिष्टात केंद्राच्या नियंत्रणाखाली येणाऱ्या उद्योगांची यादी जाहीर केली. या कायद्यात दुरुस्त्या करून केंद्रीय नियंत्रणाखालील उद्योगांची यादी वाढवीत नेली आहे. सध्या जवळजवळ १७६ उद्योग व त्यांतील काहींना लागणारे सुटे व साह्यकारी भाग उत्पादन करणारे उद्योग केंद्रीय नियंत्रणाखाली आहेत. त्यामुळे आपल्या आधिपत्याखाली फारच थोडे उद्योग राहिले आहेत अशी काही राज्यांची तक्रार आहे.

अर्थव्यवस्था संमिश्र असावी असे भारताचे धोरण आहे. त्यामुळे मूलभूत व लष्करी महत्त्वाचे उद्योग, (वीज, सिंचन व परिवहन यांसारखी) सार्वजनिक उपयोजितें ( युटिलिटिज ) ही सरकारी / सार्वजनिक क्षेत्रांत हवीत; काही प्रकारचे उद्योग ( उदा., यंत्र, हत्यारे, खते, प्रतिजैविक ( अँटिबायोटिक ) व इतर अत्यावश्यक औषधे, यांचे उत्पादन करणारे उद्योग ) स्थापण्यासाठी सरकार पुढाकार घेईल. त्यात खासगी उपक्रमाचे सहकार्य घेतले जाईल. काही उद्योग खासगी राहिले तरी त्यांवर सार्वजनिक नियंत्रण राहील; असे सरकारचे औद्योगिक धोरण आहे. तसेच एकाच प्रदेशात उद्योगांची वाढ होऊ नये, त्यांचे सर्व प्रदेशांतून विकेंद्रीकरण व्हावे, छोटया उद्योगांना संरक्षण व प्रोत्साहन मिळावे, मक्तेदारीवर नियंत्रण असावे असे हेतू या धोरणामागे आहेत. हे हेतू साध्य करणे केंद्रीय उद्योगविकास व नियमन कायद्याचे उद्दिष्ट आहे.

हे उद्दिष्ट साध्य करावयाचे तर उद्योगाची बाब केंद्राधीन राहावयास हरकत नसावी. कोणते उद्योग राष्ट्रीय/सार्वजनिक हिताचे हे लोकसभा ठरविते. ते लोकसभेवर सोपविलेले राहावे, परंतु ५२ व्या बाबीखालील केंद्रीय उद्योगविकास व नियमन कायद्याच्या परिशिष्टात जी उद्योगांची यादी दिलेली आहे ती कायम समजण्याचे कारण नाही. सामाजिक आणि आर्थिक परिस्थिती बदलणारी असल्याने सार्वजनिक हितासाठी कोणते उद्योग असावेत हे वरचेवर तपासून घ्यायला हवे. अशी तपासणी दर तीन वर्षांनी व्हावी व ती कायद्याने आवश्यक ठरवावी असे सरकारिया समितीने सुचवलेले आहे. अशा तपासणीत नवे कोणते उद्योग परिशिष्टात घ्यावेत, पूर्वीचे कोणते गाळावेत किंवा कोणत्या उद्योगांचे नियमन शिथिल करावे याचा विचार करावा. ही तपासणी तज्ज्ञ समितीने करावी व या समितीवर राज्यांचे प्रतिनिधी घ्यावेत. तसेच उद्योगांची नवी यादी मान्यतेसाठी सरकारिया समितीने सुचविलेल्या सध्याच्या राष्ट्रीय विकास मंडळाच्या जागी पुनर्घटित राष्ट्रीय आर्थिक आणि विकास मंडळापुढे ठेविली जावी.[१]

केंद्र सरकारचा हा अधिकार विशिष्ट उद्योगापुरता मर्यादित राखला जावा, कोणते उद्योग केंद्रीय नियमनाखाली राहावेत हे घटनेतच निश्चित करावे असे काही राज्यांनी सुचवले आहे. पण त्यामुळे साचेबंदपणा येईल असे सरकारिया समितीला वाटते. कायद्याने केंद्राधीन उद्योग निश्चित न करता ते तज्ज्ञ समिती व आर्थिक आणि विकास मंडळ यांच्यावर सोपवावे असे सरकारिया समितीचे मत आहे.

कोणत्या ठिकाणी, कोणत्या राज्यात केंद्रीय उद्योग निघावा हा वादग्रस्त प्रश्न झाला असून त्यासाठी

वस्तुनिष्ठ निकष लावले जात नाहीत, राजकीय तात्कालिकता आढळते अशी राज्यांची तक्रार आहे. उदाहरणार्थ, कर्नाटकात धारवाड येथे टेल्कोचा चेसी-जचा तिसरा कारखाना काढावयाचा इरादा होता, परंतु तो केंद्र सरकारने उत्तर प्रदेशात नेला. ट्रॅक्टर इंडिया लि. ला माती उचलून टाकणाऱ्या यंत्राचा कारखाना कर्नाटकात काढावयाचा होता; परंतु केंद्र सरकारची परवानगी मिळाली नाही.

१९८३ साली केंद्राने एकूण ४३२ परवाने दिले. त्यांत महाराष्ट्राला केवळ ९५ मिळाले. तसेच एकूण १०७५ इरादापत्रांपैकी महाराष्ट्रासाठी फक्त १७१ इरादापत्रे होती.[१०] अशा तक्रारीत कितपत तथ्य आहे हे प्रत्येक प्रकरणाची छाननी केल्याशिवाय समजावयाचे नाही. 'एकही उद्योग नसलेल्या' मागास राज्यांतील मागास जिल्ह्यांना प्राधान्य देण्याचा केंद्र सरकारचा हेतू यामागे नसेलच असे सांगता यायचे नाही. तसे पाहिले तर १९८४–८५ त केंद्रीय सार्वजनिक प्रकल्पां-तून स्थूल भांडवली गुंतवणूक महाराष्ट्र, मध्यप्रदेश व बिहार या राज्यांत सर्वाधिक आढळते. ती अनुक्रमे १६,११ व १२ टक्के होती. कर्नाटकचे प्रमाण ३ टक्के होते.[११]

नवीन उद्योग-प्रकल्पांची छाननी करण्यास केंद्रीय यंत्रणा बरीच सविस्तर असल्याचे दिसते. योजना आयोग, सार्वजनिक उपक्रम विभाग, अर्थव्यवहार खाते, वित्त-मंत्रालयातील योजना-वित्त विभाग, तंत्रविकास संचालनालय, सार्वजनिक गुंतवणूक मंडळ, पर्यावरण संचालनालय इ. अनेक विभागांतून नवीन प्रकल्पांची चाळणी होत असते. ती वस्तुनिष्ठ नसेल असे म्हणता येत नाही. तरीपण राज्यांच्या मनातून या बाबतीत संशय आहे. हा संशय घालविण्यासाठी नवीन उद्योग कोणत्या राज्यात काढावेत, याबद्दल राष्ट्रीय आर्थिक आणि विकास मंडळात सविस्तर चर्चा व्हावी व राज्यात कोणत्या गावी उद्योग उभारावा हे त्या राज्याचा सल्ला घेऊन ठरवावे असे सरकारिया समि-तीने सुचविलेले आहे.

( iii ) आंतरराज्य नद्यांचे पाणीवाटप हा दुसरा वादग्रस्त प्रश्न राहिला आहे. "सार्वजनिक हिता-साठी लोकसभेने कायदा केल्यास, लोकसभेने घालून दिलेल्या मर्यादेत, आंतरराज्य नद्या व नद्यांचे खोरे यांचे नियमन व विकास" ही यादी नं. १ मधील ५६ वी बाब केंद्राच्या अखत्यारीत आहे. राज्यांतर्गत म्हणजे राज्यसीमेच्या आतील पाणीवाटप, सिंचन, पाट, निचरा, बंधारे, जलाशय व जलशक्ती हे विषय यादी नं. २ मधील १७ व्या बाबीनुसार राज्यांच्या कक्षेत येतात. अर्थात संविधानाच्या ढाच्यानुसार ५६ व्या बाबीवरील केंद्राचे अधिकार १७ व्या बाबीतील राज्यांच्या अधि-कारावर मात करतात.

या बाबतीत दोन गोष्टी ध्यानी घ्यावयास हव्यात. केंद्राचे अधिकार दोन किंवा अधिक राज्यांतून वाह-णाऱ्या पाण्यावर आहेत. एकाच राज्यांतर्गत पाण्यावर नव्हेत. एकाहून अधिक राज्यांतून जाणारी नदी ही एका राज्याची मालमत्ता नव्हे. एकच राज्य हे तिचे **स्थळ** नव्हे. ती त्या राज्यातून **वाहते** एवढेच.[१२] दुसरे असे की, लोकसभेचे ५६ व्या बाबीतील अधिकार अमर्यादित नाहीत. नदीचे पाणी दोन व अधिक राज्यां-तून वाहते हवे. या पाण्यावर केंद्राचा किती अधिकार राहील व तो सार्वजनिक हितापायी आहे हे आधी लोकसभेने ठरविले पाहिजे. हे ठरविल्यानंतरच केंद्राचा अधिकार सुरू होईल, आधी नाही.

५६ व्या बाबीतील अधिकाराखाली केंद्र सरकारने नदी-मंडळ कायदा १९५६ केला. परंतु आजतागायत तो शासनात पडून आहे. आंतरराज्य नदी-तंटा मिट-विण्यासाठी आंतरराज्य नदी-तंटा कायदा केंद्राने केला आहे. या कायद्यानुसार, राज्यांनी आधी हा तंटा आप-सात मिटविण्याचा प्रयत्न करायला हवा. (कोणकोणते प्रयत्न केले हे राज्यांनी सविस्तर कळवायला हवे.) हा प्रयत्न जर फसला तर त्यासाठी लवाद नेमावा असा राज्याने केंद्राकडे अर्ज करायला हवा. हा अर्ज आल्या-वर तंटा आपसात मिटविण्याकरिता केंद्रालाही प्रयत्न करायला हवा. आणि तो आपसात मिटविणे शक्य नाही अशी केंद्राची **खात्री पटल्यावरच** केंद्र हा तंटा न्यायाधीकरणाकडे सोपवू शकेल. ही कार्यपद्धती जिकिरीची व वेळखाऊ आहे. त्यात एखाद्या राज्याने आडमुठेपणा सुरू केला तर विचारायलाच नको. ( कृष्णा, गोदावरी व कावेरी नद्यांच्या पाणीवाटप तंट्यांसंबंधी, व लवादाचा निवाडा एखादे राज्य कसे धुडकावू पाहात आहे याचा कर्नाटक व महाराष्ट्राचा अगदी ताजा व चालू अनुभव आहे.) न्यायाधीकरण नेमण्यापूर्वी, त्याचा निवाडा होण्यात व हा निवाडा कार्यवाहीत येण्यात कितीतरी वर्षे मोडतात. त्याहून

न्यायाधीकरणाकडे तंटा सोपवावयाचा की नाही, याची गुंतागुंत करून ती सोडविण्यात बरीच वर्षे लोटतात. कायद्यात दुरुस्ती करून दिरंगाईची ही कारणे नाहीशी करावीत असे सरकारिया समितीने सुचविले आहे. राज्यांनी आपसात तंटा मिटविण्यास तीन वर्षांहून अधिक काळ थांबू नये; पाणी-तंटा मिटत नाही असा राज्यांचा अर्ज आल्यापासून वर्षाच्या आत केंद्राने न्यायाधीकरण नेमण्याची केंद्रावर कायद्याने सक्ती असावी. असा तंटा आहे हे लक्षात येताच राज्यांच्या अर्जांची वाट न पाहता केंद्राने स्वतःहून न्यायाधीकरण नेमावे. या न्यायाधीकरणाच्या निवाड्याला सर्वोच्च न्यायालयाच्या निकालाइतकीच अनुशास्ती (Sanction) व दंडशक्ती असावी.

नदी-तंटा न्यायाधीकरणाच्या निवाड्यास वेळ लागण्याचे एक कारण असे आहे की, नदीच्या पाण्याची क्षमता, पातळी, प्रवाहाचे माप इत्यादींसंबंधी माहिती राज्ये पूर्णपणे व तत्परतेने पुरवीत नाहीत. तेव्हा अशी माहिती गोळा करीत राहणारी वेगळी यंत्रणा केंद्राने निर्माण करावी व तोवर ही माहिती पुरविण्यास राज्यांना भाग पाडण्यास नदी-तंटा कायद्यात कायदेशीर तरतूद करावी. अशा सूचना सरकारिया समितीने केलेल्या आहेत.

यादी नं. १ मधील ५६ व्या बाबीचे केंद्राचे अधिकार काढून घेण्याची राज्यांची मागणी समितीने फेटाळली आहे.

(iv) 'शिक्षण' हा विषय वेगवेगळ्या रूपांत सातव्या परिशिष्टातील तिन्ही यादींत (केंद्र, राज्ये यांच्या अधिकारात व समवर्ती बाब म्हणून) येत असे. परंतु १९७६ च्या ४२ व्या घटनादुरुस्तीनुसार (३-१-१९७७ पासून) राज्यांच्या आधिपत्याखालून तो विषय काढून घेतला गेला व आता तो केंद्र व समवर्ती यादीत प्रविष्ट आहे. जोवर केंद्रात आणि राज्यांत एकाच पक्षाची सरकारे होती तोवर या विषयाबाबतीत वाद आला नाही व तो जवळजवळ समवर्ती यादीतील बाबीसारखा कार्यवाहीत राहिला. पण १९६७ नंतर या विषयाबाबत मतभेद व संघर्ष सुरू झाले. उदाहरणार्थ, राष्ट्रीय ऐक्याच्या दृष्टीने राज्यांनी वैद्यक आणि अभियांत्रिकी महाविद्यालयांतून अन्य राज्यांतील विद्यार्थ्यांना प्रवेश नाकारू नये, अधिवाससंबंधीचे निर्बंध घालू नयेत असे केंद्राने राज्यांना कळविले. पण राज्यांनी ही सूचना पाळली नाही. राज्यांच्या कक्षेतही (यादी नं. २ मधील ११ वी बाब) शिक्षण हा विषय येत असल्याने या बाबतीत केंद्र हतबल ठरले. सर्वत्र शिक्षणाचा दर्जा सारखाच राहावा, एकसारखा किमान अभ्यासक्रम असावा, प्राथमिक शिक्षण सार्वत्रिक व्हावे (संविधानाच्या आदेशानुसार) व त्यासाठी केंद्राला अधिक बळ मिळावे, शिक्षणासंबंधी राष्ट्रीय धोरण ठरविता यावे या हेतूने आता ही बाब राज्यांच्या कक्षेतून काढून घेतली गेली.

परंतु यानंतर त्याला अनुसरून कोणतीही कारवाई केली गेली नाही. आणि व्यवहारात ४२ वी घटनादुरुस्ती होण्याआधी जी स्थिती होती ती तशीच पुढे चालू राहिली आहे. राज्यांच्या कक्षेत ही बाब असताना, १९५१ च्या विद्यापीठाच्या दर्जाच्या नियमनासंबंधीच्या केंद्राच्या विलात विद्यापीठाच्या स्थापनेचा व कोणत्याही विद्यापीठाच्या पदव्यांची मान्यता काढून घेण्याचा केंद्राला अधिकार देणाऱ्या दोन तरतुदी समाविष्ट होत्या. पण राज्यांच्या कक्षेत हा विषय त्या वेळी असल्याने या तरतुदी मागे घेणे भाग पडले. त्यामुळे उच्च शिक्षणातील दर्जा ठरविण्यावर व समन्वय साधण्यावर केंद्राचा व विद्यापीठ अनुदान मंडळाचा कसलाच प्रभाव राहिला नाही.[१३]

गेल्या वर्षीचा (१३-८-८७) सर्वोच्च न्यायालयाचा निकाल या बाबतीत ध्यानात घेण्याजोगा आहे. आंध्र प्रदेशाने १९८६ त राज्यातल्या सर्व विद्यापीठांतून शिक्षणाचा समान दर्जा व समन्वय साधण्याकरिता एक कायदा केला. परंतु ४२ व्या घटनादुरुस्तीनुसार तो रद्दबातल ठरला. पण त्याच वेळी विविध विद्यापीठांतून उच्च शिक्षणाचा दर्जा भिन्न, सदोष व उणा असल्याने त्यात सुधारणा व समन्वय साधण्याची किती नितान्त गरज आहे याकडे लक्ष वेधून त्यासाठी विद्यापीठ-अनुदान मंडळाने परिणामकारी प्रयत्न करणे अगत्याचे आहे असे सर्वोच्च न्यायालयाने म्हटले आहे.[१४] म्हणजे सध्याचे विद्यापीठ अनुदान मंडळ निष्प्रभ आहे हे ओघानेच आले. ते कायद्यातील त्रुटीमुळे, का त्याच्या रचनादोषामुळे निष्प्रभ ठरले आहे याचा सखोल अभ्यास होणे आवश्यक आहे. या मंडळाचे कार्य कसे वस्तुनिष्ठ, दर्जेदार, प्रभावी व परिणामकारी राहील याकडे लक्ष द्यायला हवे. त्यासाठी आवश्यक त्या कायदेशीर तरतुदी करायला हव्यात.

अनुक्रमणिका

शिक्षणातील एकात्मता, राष्ट्रीयता, दर्जा व मान राखण्यासाठी केंद्र व राज्यांचे सहकार्य आवश्यक आहे व त्यासाठी "शिक्षण" ही बाब, राज्यांच्या मागणी-प्रमाणे, समवर्ती यादीतून न गाळता ती तिथे राहू देणे अगत्याचे आहे; पण या बाबतीत केंद्र व राज्ये यांच्यात विरोध येऊ नये म्हणून शिक्षणाचे मान व दर्जा ठरविण्याचे कार्य विद्यापीठ–अनुदान–मंडळाने करावे व त्याची कार्यवाही राज्यांकडे सोपवावी असे सरकारिया समितीने सुचविलेले आहे.

(v) समवर्ती यादीत ३३ वी बाब पुढीलप्रमाणे आहे–

१) लोकसभा 'सार्वजनिक हिताचा' म्हणून केंद्रीय नियंत्रणासाठी जो उद्योग ठरवेल त्या उद्योगाचे उत्पादन आणि त्या उत्पादनासमान आयात वस्तू,
२) खाद्यतेल बिया, खाद्यतेल यांच्यासह अन्नसामग्री,
३) वैरण व पेंड,
४) वटलेला वा न वटलेला कच्चा कापूस, सरकी,
५) कच्चा ताग,

यांचे उत्पादन, पुरवठा व वितरण यांचा व्यापार.

यांतील उद्योगासंबंधीचा विचार व त्या बाबतीतील लोकसभेचा अधिकार हिरावून घेण्याच्या... राज्यांच्या सूचना सरकारिया समितीने फेटाळल्याचे वर (ii) मध्ये चर्चिले आहे. अन्नसामग्रीबद्दलचा समितीचा दृष्टि-कोण यापुढे पाहू.

अन्नधान्ये, खाद्यतेले, साखर व रॉकेल इत्यादींचा पुरवठा देशाच्या सर्व भागांतून, दूरवरच्या दुष्कर भागांतून सारख्या प्रमाणात सर्वांना मिळेल, स्वस्ताईने मिळेल, टंचाई व दुष्काळाच्या काळात मिळेल याबद्दलची जबाबदारी केंद्र व राज्ये दोघांचीही आहे (म्हणून समवर्ती यादी). त्यासाठी हंगामात अन्नधान्ये (तांदूळ, गहू, ज्वारी व साखर इ.) सक्तीने वसूल करणे, साठविणे व त्यांचे वितरण करणे, वसुलीसाठी भाव ठरविणे इ. कार्ये अंगीकारावी लागलेली आहेत. अन्नधान्यांचे उत्पादन विपुल झाले तर शेतकऱ्यांना किमान भाव मिळावा हाही हेतू सरकारी खरेदीमागे आहे.

अन्यधान्ये सर्वत्र सारखी व पुरेशी पिकत नाहीत. तांदूळ आंध्रात तर गहू पंजाबात पिकतो. या राज्यांनी तो राज्याबाहेर जाऊ देण्यास, केंद्राला खरेदी करण्यास मनाई केली तर इतर राज्यांत तीव्र टंचाई व उपासमार घडेल. यासाठीही तो विषय समवर्ती यादीत ठेवला आहे.

३३ व्या बाबीखाली केंद्राने "आवश्यक वस्तूंचा कायदा, १९५५", "काळाबाजार प्रतिबंधक व आवश्यक वस्तूंचा पुरवठा टिकविण्याचा कायदा, १९८०", "भातसडीच्या गिरण्यांच्या नियमनाचा कायदा, १९५८", "वखार नियम कायदा, १९६२" इ. कायदे करून आवश्यक वस्तूंची वसुली, पुरवठा, व वितरण यांवर नियंत्रक अधिकार केंद्राने मिळविलेले आहेत. अन्न-धान्यांची विपुलता कोणा एका राज्याची मक्तेदारी राहू नये, व्यापारावर राज्यांचे अनावश्यक निर्बंध येऊ नयेत हे पाहण्याची जबाबदारी केंद्राची असल्याने केंद्राची एकंदर अधिसत्ता राखण्याचे काम समवर्ती यादीतील ही ३३ वी बाब करते. तसेच राज्य सरकारांना या बाबतीत निर्देशन करणे त्यामुळेच शक्य होते. त्यामुळे यादी नं. ३ मधून ही बाब काढून टाकण्यास सरकारिया समितीने नकार दिलेला आहे.

अन्नधान्याच्या व्यवस्थापनात राज्यांचा सल्ला घेण्यास सध्या कोणतीही यंत्रणा नाही. त्यामुळे त्यासाठी एक "अन्नधान्याचे व्यवस्थापन व सार्वजनिक वितरण-व्यवस्था यांसाठी सल्लागार मंडळ" नेमले जावे असे समितीने सुचविलेले आहे. अन्नधान्य व्यवस्थापनाचे दीर्घ मुदतीचे धोरण, विविध राज्यांनी अंमलात आणण्यासाठी कोणती कार्यवाही करणे जरुरीचे आहे इ. संबंधी चर्चा या मंडळाने करावी व बहुमताने धोरण ठरवावे, आवश्यक तिथे तज्ज्ञांचा सल्ला घ्यावा असे समितीने सुचविलेले आहे. वसुली व वितरणव्यवस्थेचा वरचेवर आढावा घेऊन व्यवस्थापनात नेटकेपणा येईलसे या मंडळाने पाहावयास हवे.

समवर्ती यादीत असे विषय आहेत, की ते राज्यांचे केवळ विषय होऊ शकत नाहीत. राज्यांची सत्ता त्यांच्या सीमेत चालते. त्या सीमेबाहेर नाही. हे विषय जसे केवळ स्थानीय नाहीत तसेच ते केवळ राष्ट्रीय नाहीत. म्हणजे राज्याराज्यांतील परिस्थितीनुसार त्यांत फरक राहू शकतो. तेवढ्यापुरती राज्यांची अधिसत्ता जरुरीची असली तरी एकंदरीने या विषयांच्या धोरण-व्यवस्थापनात एकरूपता राहण्यासाठी केंद्राचा प्रभाव असणे आवश्यक आहे. तेव्हा केंद्र व राज्ये यांचे सहकार्य, सर्वसामान्य मतैक्य, कार्यवाहीत बांधीलकी व बंधन असणे व त्यापायी मोकळेपणी चर्चा होणे





आवश्यक आहे. अशा चर्चेसाठी दोघांना एकत्र आणणाऱ्या संस्था हव्यात. अशा संस्था निर्माण व्हाव्या यासाठी सरकारिया समितीचा प्रयत्न व सूचना आहेत. संविधानात तशा तरतुदी आहेत व या तरतुदींचा उपयोग केला जायला हवा.

– ६ –

राज्यपालांची निवड, नेमणुका, त्यांचे अधिकार व व्यवहार हा केंद्र–राज्य संबंधातील सर्वांत कटुतेचा विषय ठरला आहे. हा संघर्ष दोन पातळ्यांवर येतो. एक व्यक्तीसंबंधी व दुसरा संविधानाने बहाल केलेल्या राज्यपालांच्या स्वेच्छाधीन अधिकारासंबंधी.

( अ )

राज्यपालपदासाठी निवडलेली व्यक्ती ही चारित्र्यसंपन्न, ज्ञानी व अनुभवी असावी हे उघड आहे. प्रत्यक्ष राजकारणाशी तिचा आधी किंवा नंतर संबंध येणारा नसावा.[१५] कारण मग राज्यपालपद गेल्यावर मिळू शकणाऱ्या, अपेक्षिलेल्या सत्तापदावर डोळा ठेवून केंद्र सरकारला अनुकूल असे निर्णय घेण्याची शक्यता असते. राजकारण खेळण्यात पारंगतता हा तिच्या निवडीचा निकष नसावा. तिने सदैव निःपक्षपाती असायला हवे व तसे दिसायला हवे. राज्यपाल पक्षपाती असणार असा आधीपासून संशय येऊ द्यायचा नसेल तर तो, अन्यपक्षीय राज्यसरकार असताना, केंद्रातील सरकारपक्षाचा नसावा. राज्याबाहेरील असावा. प्रत्यक्ष राजकारणातून वगळावा लागणारा, मुख्यमंत्रिपद, महामंडळाचे अध्यक्षपद किंवा इतर सक्रिय राजकारणाची पदे देण्यासाठी कटाक्षाने गाळावा लागणारा, निवडणूक हरलेला व इतरत्र वर्णी लावावी म्हणून निवडलेला असा राज्यपाल नसावा. तसेच काही भ्रष्टाचाराचे, सत्तेचा गैरवापर केल्याचे आरोप असल्याने मंत्रिपदाचा राजीनामा दिलेल्या व्यक्तीची निवड या पदासाठी केली जाऊ नये.

राज्यपालपदासाठी निवड करताना पुढील निकष लावावेत असे सरकारिया समितीने सुचविलेले आहे.

ती व्यक्ती :

१) कोणत्यातरी एका क्षेत्रात प्रवीण असावी.

२) राज्याबाहेरील असावी.

३) स्थानीय राजकारणापासून अलिप्त असावी.

४) अगदी अलीकडे तिचा सक्रिय राजकारणाशी संबंध नसावा. (शेवटच्या मानाचे हे पद असावे.)



अल्पसंख्य गटाला प्राधान्य देण्याचे पुढेही चालू ठेवावे. याचा अर्थ असा की, राज्यपालांची निवड निर्वाचन पद्धतीने न करता नामनिर्देशनाने करावी. अन्यथा अल्पसंख्य गटातील गुणी व्यक्तींना कधीच संधी मिळावयाची नाही.

नामनिर्देशनपद्धत मान्य केली तरी त्यात राज्यांनी सुचविलेले पुढील तीन पर्याय येतात :[१६]

१) राज्यविधानसभेने मंजूर केलेल्या नामावलीतून निवड.

२) मुख्यमंत्र्याने स्वतः किंवा त्याच्या अनुमतीने दिलेल्या नामावलीतून निवड.

३) मुख्यमंत्र्याचा नेहमीच सल्ला घेऊन केलेली निवड.

राज्यपालाच्या निवडीचा विषय विधानसभेपुढे आल्यास ती प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष निवडणूक ठरेल. अशा रीतीने निवडलेला राज्यपाल मुख्यमंत्र्याच्या अधिकारावर कुरघोडी करण्याची शक्यता नाकारता येत नाही. त्यातून त्या दोघांत रस्सीखेच सुरू होईल. 'जबाबदार सरकार' या कल्पनेला त्यामुळे धोका पोचेल. तसेच अशा निवडीमुळे राज्यपाल मुख्यमंत्र्याचे बाहुलेदेखील होऊन बसेल. यामुळे राज्याचा कारभार घटनेप्रमाणे चालतो की नाही हे पाहण्याची राष्ट्रपतीचा प्रतिनिधी म्हणून राज्यपालावर सोपविलेली जबाबदारी तो योग्य रीत्या पार पाडू शकणार नाही.

विधानसभेऐवजी मुख्यमंत्र्याने नामावली द्यावयाचे ठरविले तरी या अडचणी कमी होणाऱ्या नाहीत. केंद्र व राज्यांची सरकारे विभिन्न पक्षाची असताना राज्यपाल निवडीची प्रक्रिया परस्परांच्या अडवणुकीत अडकून पडेल. राज्यपाल निवडण्याची जबाबदारी पंतप्रधानांची आहे. त्यामुळे त्याबद्दलची नामावली तयार करण्याचे काम मुख्यमंत्र्यावर सोपविता येणार नाही. म्हणून पहिले दोन्ही पर्याय सरकारिया समितीने फेटाळले आहेत.

राज्यपाल निवडीचे काम पंतप्रधानावर सोपविल्यावर त्याची नेमणूक करण्यापूर्वी त्याने संबंधित राज्याच्या मुख्यमंत्र्याचा सल्ला घ्यावा. सल्ला याचा अर्थ केवळ कळविणे असा होत नाही. नेमणूक करावयाच्या व्यक्तीच्या पात्रता-पसंतीबद्दलचा मुख्यमंत्र्याचा सल्ला घेणे होय. कारण नेमणूक केंद्राची असली तरी राज्यपालाचा कारभार मुख्यमंत्र्याच्या सल्लासहकाराने

अनुक्रमणिका

होणारा असतो. त्यांच्यात विरोध येत राहणार नाही हे पाहायला हवे. सध्या अशी प्रथा आहे असे म्हटले तरी राज्यांना त्याबद्दल खात्री वाटत नाही. यासाठी घटनेच्या १५५ व्या कलमात राज्यपालाच्या नेमणुकी-संबंधात मुख्यमंत्र्याचा सल्ला आवश्यक असल्याची स्पष्टपणे नोंद करावी असे सरकारिया समितीने सुचविलेले आहे.

राज्यपालपदासाठी करावयाच्या निवडीसाठी पंतप्रधानांनी उपराष्ट्रपती व लोकसभाध्यक्ष यांचा सल्ला घ्यावा असे सरकारिया समितीने सुचविलेले आहे. हा सल्ला गोपनीय असावा. म्हणजे त्यात राजकारण खेळले जाणार नाही. तसेच हा सल्ला सक्तीचा न ठेवता ऐच्छिक अतः प्रथा-परंपरेने यावा असे समितीला वाटते.[१७]

सामान्यपणे राज्यपालपद हे पाच वर्षांसाठी असावे. दुसरी पाच वर्षांची मुदत वाढविण्यास हरकत नसावी. परंतु यानंतर राज्यपालपदी असणाऱ्या व्यक्तीने पुन्हा राजकारणात पडू नये. किंवा कोणत्याही सरकारी वा खासगी लाभाच्या पदाचा लोभ धरू नये; कारण त्यामुळे पदाची शान नाहीशी होणारी आहे. पद घ्यायचेच तर ते राज्यपालपदाच्या तोलामोलाचे (उदा., उपराष्ट्रपतिपद) असावे. अशी प्रथा पडणे अगत्याचे आहे.

अन्य पदांचा मोह टळावा यासाठी राज्यपालांना निवृत्तीनंतरचे लाभ, निवृत्तिवेतन दिले जावे.

(आ)

राज्यपाल हा राज्याचा सांविधानिक प्रमुख आहे. हे कार्य त्याने मुख्यमंत्र्याच्या नेतृत्वाखालील मंत्रिमंडळाच्या मदतीने व सल्ल्याने पार पाडावयाचे आहे. राज्यपालाची काही अशीही कर्तव्ये आहेत, की ती स्वेच्छाधीन आहेत. त्यांत मंत्रिमंडळाचा सल्ला घेण्याची आवश्यकता नाही.

राज्यपाल हा संविधानाचा रक्षक आहे. केंद्र व राज्ये यांच्यातील तो जिव्हाळ्याचा दुवा आहे. रक्षणकर्ता म्हणून त्याला राष्ट्रपतींना राज्यातील स्थितीबद्दल अहवाल देत राहिले पाहिजे. याकरिता त्याला राज्यातील घडामोडींबद्दल सविस्तर माहिती मिळवावयास हवी. ती मुख्यमंत्री देईल किंवा राज्यपालही अधिकाऱ्यांकडून काढून घेईल. अशी माहिती नाकारता येणार नाही. याकरिता राज्यपालाचा दृष्टिकोण नेहमीच वस्तुनिष्ठ असावयास हवा.

राज्यपालांना शेजारील केंद्रशासित प्रदेशाचा प्रशासक म्हणून, तसे निर्देशिल्यास, काम पाहावे लागते. राज्यात राष्ट्रपतींची राजवट आल्यास त्या राज्याचा तो प्रशासक असतो. असे झाल्यास राज्यपाल हे केंद्राचे प्रतिनिधी राहतात.

राज्यपालांना सांविधानिक प्रमुख, सांविधानिक रक्षक, केंद्राचा प्रतिनिधी अशा त्रिविध भूमिका पार पाडाव्या लागतात.

राज्यपालांना स्वेच्छाधीन अधिकार वापरण्याचे काही प्रसंग पुढीलप्रमाणे येतात.[१८]

१) मुख्यमंत्र्याची नेमणूक करताना – निवडणुकीनंतर, मंत्रिमंडळाने राजीनामा दिल्यास किंवा ते बरखास्त केल्यास,
२) विधानसभेचा विश्वास गमावल्यावर मंत्रिमंडळाने राजीनामा द्यायचे नाकारल्यास,
३) एखाद्या मंत्र्याच्या निर्णयाविरुद्ध त्या गोष्टीचा संबंध मंत्रिमंडळाने विचार करावा यासाठी,
४) काही कृती व त्रुटी यांमुळे मंत्रिमंडळास घटनेनुसार कार्य करण्यास अशक्य करणारी परिस्थिती निर्माण झाली असेल तर तसा राष्ट्रपतींना अहवाल देताना,
५) राष्ट्रपतींच्या विचारासाठी विधानसभेने पास केलेले बिल राखून ठेवताना.

राज्यपालांचे स्वेच्छाधीन अधिकार त्यांच्या लहरीवर सोपविलेले नसून त्यांना ते काटेकोरपणे घटनेच्या चौकटीतच वापरावयाचे आहेत. स्वेच्छाधीन अधिकार अटळ, आवश्यक, व अपरिहार्य परिस्थितीतच वापरायला हवेत. ते सद्सद्विवेकपूर्ण, सावधपणे, आणि सद्भावनेने वापरले जायला हवेत.

विधानसभेत ज्या एका वा संयुक्त आघाडी पक्षाला बहुमत असेल त्या पक्षाला मुख्यमंत्रिपद द्यावे हे उघड आहे. राज्यपालांनी सरकार स्थापले जाईलसे पाहावयाचे आहे. आपले धोरण चालविणारे सरकार स्थापावयाचे नाही.[१९] परंतु एका किंवा संयुक्त आघाडी पक्षाला बहुमत नसेल, तर मुख्यमंत्रिपदासाठी निवड पुढीलप्रमाणे करावी असे सरकारिया समिती सुचविते. त्यासाठी,

१) निवडणुकीपूर्वी युती केलेल्या पक्षांच्या युतीला पाचारण करावे.







अनुक्रमणिका

२) स्वातंत्र्यासह इतर पक्षांच्या मदतीने सरकार स्थापन करण्याचा दावा मांडणाऱ्या सर्वाधिक आमदार असणाऱ्या पक्षाला पाचारण करावे.

३) निवडणुकीनंतर संयुक्त दल स्थापन झाल्यास व ते सगळे सरकारात सामील होणार असतील तर संयुक्त दलाला पाचारण करावे.

४) निवडणुकीनंतर काही पक्ष एकत्र आले व स्वतंत्रांसह इतर पक्षांचा पाठिंबा असेल तर अशा काही पक्षांच्या संयुक्त दलाला पाचारण करावे.

मुख्यमंत्रिपदी येणाऱ्या व्यक्तीला केवळ नव्हे तर मंत्रिमंडळातील सर्व व्यक्तींना बहुसंख्य आमदारांचा पाठिंबा असायला हवा. अशा वेळी वरील क्रमानुसार मुख्यमंत्र्याची निवड झाली असेल, तर त्यानंतर तीस दिवसांत किंवा जास्तीत जास्त साठ दिवसांत मंत्रिमंडळाने विधानसभेत बहुमत सिद्ध करावे. या बाबतीत राज्यपालपदी असणाऱ्या व्यक्तीचा अनुभव, मन वळविण्याचे कौशल्य व चाणाक्षपणा कसाला लागतो असे सरकारिया समितीने नमूद केले आहे.[२०]

(इ)

राज्यविधानसभेने पास केलेल्या बिलास संमती देणे, न देणे राज्यपालांच्या हाती आहे. सामान्यपणे राज्यमंत्रिमंडळाचा सल्ला राज्यपालाने मानायला हवा. अगदी क्वचित व अपवादात्मक परिस्थितीतच राज्यपालाने आपले स्वेच्छाधीन अधिकार वापरले पाहिजेत. या अधिकाराखाली एखाद्या बिलाला संमती नाकारावयाची असेल किंवा ते राष्ट्रपतींच्या विचारासाठी पाठवावयाचे असेल तर त्याला काही विशिष्ट कारण असायला हवे. अशी कारणे पुढीलप्रमाणे सांगता येतील.[२१]

१. व्यक्तींची कायद्यापुढील समानता, किंवा कायद्यांचे असणारे समान संरक्षण नष्ट करणारी बिले.

२. व्यक्तींचे भाषणस्वातंत्र्य, संघटनास्वातंत्र्य, स्थलांतरस्वातंत्र्य, कुठेही राहण्याचे स्वातंत्र्य व व्यापार–उद्योग–व्यवसायस्वातंत्र्य इ. मूलभूत हक्कांचा संकोच करणारी बिले.

३. समवर्ती यादीतील विषयासंबंधीची बिले.

४. केंद्रीय कायद्याखाली स्थापन झालेल्या प्राधिकरणांनी साठविलेल्या, उपयोजिलेल्या, वितरण केलेल्या व उत्पादिलेल्या पाणी व वीज यांच्यावर कर, शुल्क लादणारी बिले.

५. व्यापार–व्यवहाराचा, राष्ट्रपतींच्या अनुज्ञेशिवाय, संकोच करणारी बिले.

राष्ट्रपतींच्या विचारासाठी पाठविलेल्या बिलांच्या विचारापायी दिरंगाई होऊ नये म्हणून ती पाठविताना राज्यपालांनी पुढील गोष्टी स्पष्ट कराव्यात–[२२]

i) संविधानाच्या कोणत्या कलमाखाली सदर बिलाने बाधा येते व ती का येते.

ii) सध्याच्या कोणत्या कायद्याला किंवा कोणत्या केंद्रीय कायद्याला सदर बिलाच्या कोणत्या कलमामुळे बाधा येते.

iii) राज्यपालांच्या स्वेच्छाधीन अधिकारात किंवा मंत्रिमंडळाच्या सल्ल्याने राष्ट्रपतींच्या विचारासाठी बिल पाठवावयाचे तर त्याची कारणे.

iv) बिलाचे केवळ उद्देश व कारणे न सांगता त्यांमागील धोरणाची चिकित्सा करावी.

v) राष्ट्रपतींच्या विचारासाठी बिल का पाठवले याचे पूर्वीच्या संदर्भासह स्पष्टीकरण.

एखादे बिल तयार करताना राज्य-सरकारातील अधिकारी केंद्र-सरकारातील अधिकाऱ्याबरोबर चर्चा करीत असतात, सल्ला घेत असतात असे आढळून आलेले आहे. ही एक निकोप प्रथा आहे व ती पाळली जावी. यामुळे राष्ट्रपतींच्या विचारासाठी एखादे बिल पाठविले तर त्यातील दिरंगाई पुष्कळच कमी होईल असे सरकारिया समितीने सांगितले आहे.[२३]

१९७७ ते १९८५ या काळात एकूण ११३० बिले राष्ट्रपतींच्या विचारासाठी राज्यांनी पाठविली. त्यांतील १०३९ बिलांना राष्ट्रपतींची संमती मिळाली. त्यांतील ५५ बिले नोव्हेंबर १९८५ अखेर विचारासाठी राहिलेली होती. पाच बिले फेरविचारासाठी राज्यांकडे परत गेली होती. फक्त ३१ बिलांना संमती मिळाली नाही.

राष्ट्रपतींच्या विचारासाठी पाठविलेल्या बिलांतील जवळजवळ पाऊणपट बिले समवर्ती यादीतील बाबींसंबंधी होती व ती राज्यमंत्रिमंडळांच्या सल्ल्यानुसार राज्यपालांनी राष्ट्रपतींकडे पाठवली होती. अगदी थोडी बिले राज्यपालांनी स्वेच्छाधीन अधिकार वापरून राष्ट्रपतींकडे पाठविलेली आढळली.[२४]

तेव्हा या बाबतीत राज्यपालांनी स्वेच्छाधीन अधिकाराचा गैरउपयोग केला असे म्हणता यावयाचे नाही.

— ७ —

या संघराज्यात्मक केंद्राकर्षी संविधानात केंद्र-राज्यांचा नित्य सहकार आवश्यक आहे. परस्परांशी मोकळेपणी चर्चा, सल्लामसलत ही संशयाचे वातावरण घालविण्यास जरुरीची आहे. अशी चर्चा घडवून आणणारे सध्या कोणतेही व्यासपीठ नाही.

संविधानाच्या २६३ व्या कलमानुसार केंद्र व राज्यांचे मिळून राष्ट्रीय प्रश्नांची चर्चा करणारे, परस्परांच्या मतांची अजमावणी करणारे, सल्ला घेणारे, सार्वमताने धोरण ठरविणारे, धोरणात सुसूत्रता आणणारे असे आंतरशासन मंडळ ( Inter Governmental Council) स्थापने शक्य आहे व आवश्यक आहे. ते तसे स्थापले जावे असे सरकारिया समितीने सुचविलेले आहे.

आंतरशासन मंडळ सल्ला देणारे राहील. हा सल्ला शिफारसवजा राहील. केवळ राष्ट्रीय प्रश्नांची चर्चा इथे राहील. राष्ट्रीय विकास योजनांची चर्चा इथे केली जाऊ नये. त्यासाठी राष्ट्रीय विकास मंडळ ( समितीने सुचविल्याप्रमाणे ते सुधारून राष्ट्रीय आर्थिक आणि विकास मंडळ राहील ) आहे व ते असावे. आणीबाणी आणण्याचे अधिकार केवळ केंद्राचे असल्याने व तो अगदी शेवटचा उपाय असल्याने त्याचीही चर्चा या मंडळात होऊ नये. तसेच राज्यपालपदाकरिता असलेल्या व्यक्तींच्या निवडीची चर्चा इथे होऊ नये.

आंतरशासन मंडळाचे पुढीलप्रमाणे सभासद राहतील—

१) पंतप्रधान ( अध्यक्ष )
२) सर्व मुख्यमंत्री
३) सर्व केंद्रीय कॅबिनेट दर्जाचे मंत्री ( किंवा केंद्र-राज्यांच्या समान विषयाशी संबंधित मंत्री )

या सर्वसामान्य आंतरशासन मंडळाच्या विचारासाठी कोणते राष्ट्रीय महत्त्वाचे विषय यावेत हे ठरविण्यासाठी एक स्थायी समिती असावी. या स्थायी समितीचे पुढीलप्रमाणे सभासद असावेत—

१) पंतप्रधान ( अध्यक्ष )
२) सहा मुख्यमंत्री
( राज्यांची जी प्रादेशिक मंडळे ( Zonal Councils) आहेत, त्यांतील मुख्यमंत्र्यांची आळीपाळीने निवड करून )
३) सहा पंतप्रधानांनी निवडलेले, केंद्रीय कॅबिनेट दर्जाचे मंत्री.

प्रसंगोपात्त काही विषयांचा सखोल अभ्यास करण्यास स्थायी समिती व सर्वसामान्य आंतरशासन मंडळ उपसमित्या नेमू शकेल.

आंतरशासन मंडळाच्या व स्थायी समितीच्या बैठकी नेहमीच गुप्त राहाव्यात. “सर्वांपुढे उच्चारलेला शब्द परत घेता येत नाही. पण चर्चेत तोंडून गेलेल्या शब्दाचा पुनर्विचार व छाननी करता येते. अशा वेळी तो प्रतिष्ठेचा प्रश्न राहात नाही व परस्परांतील विचारविनिमयातून तो मिटवता येतो.” या प्रशासकीय सुधारणा समितीच्या उद्गारांचा सरकारिया समितीने पुनरुच्चार केला आहे.[३५] या मंडळाच्या बैठकींचे स्वरूप मंत्रिमंडळाच्या बैठकीसारखेच असावे.

सर्वसामान्य आंतरशासन मंडळाचा कारभार योग्य रीतीने व सुसूत्रपणे चालावयाचा तर त्यासाठी कायम स्वरूपाचे व वेगळे सचिवालय असणे जरुरीचे आहे. मंडळापुढे येणाऱ्या प्रत्येक बाबीची सविस्तर छाननी, साधार माहिती, कागदपत्रे व अभ्यासपूर्ण लेख मंडळाला पुरविण्याचे काम या सचिवालयाकडे राहील.

केंद्र-राज्य संघर्ष कमी करायला, मतभेद मिटविण्याला, संशय निवळविण्याला, सहकार्याचे वातावरण तयार करायला आंतरशासन मंडळाचा पुष्कळसा उपयोग होईल असे सरकारिया समितीस वाटते.

प्रादेशिक राज्यमंडळे पुन्हा क्रियाशील करावीत. तेही राज्यांच्या परस्परविचाराने, सहकाराने कार्य करण्याचे व मतभेद कमी करण्याचे व्यासपीठ आहे, तसे ते राहावे.

— ८ —

भारतीय संविधानाचा ढाचा हा सहकारी संघराज्याचा आहे असे सरकारिया समिती सारखे सांगते. या दृष्टिकोणातून ती आपला अहवाल देते व सूचना करते. या सूचना संविधानांतर्गत कलमांवर आधारलेल्या व चांगल्या प्रथा पडाव्या म्हणून करते. त्यापायी संविधानात मोठाले बदल करण्याची मुळीच आवश्यकता नाही. जे बदल सरकारिया समितीस हवे आहेत ते पुढीलप्रमाणे मांडता येतील—

अ) कलम १५५ : राज्यपालांची उपराष्ट्रपती व लोकसभाध्यक्ष यांच्या सल्ल्यानुसार निवड व मुख्यमंत्र्याच्या संमतीने नेमणूक.








अनुक्रमणिका

आ) कलम २१७ : उच्च न्यायाधीशांच्या रिकाम्या जागा भरण्यासाठी काही कालमर्यादा घालणारे नियम करण्यासाठी राष्ट्रपतींना अधिकार.

(यांची या लेखात चर्चा केलेली नाही.)

इ) कलम २४८ व सातव्या परिशिष्टातील यादी नं. १ मधील ९७ वी बाब : करविषयक अधिकार वगळता उर्वरित अधिकार समवर्ती यादीत समाविष्ट करणे.

ई) कलम २५२, २६९ (१), २७२, २७६ (२) : ही कलमे करविषयक आहेत. त्यांची चर्चा पुढील लेखांकात.

उ) कलम ३५६ : एखादे राज्य घटनाबाह्य कारभार करते आहे असे आढळल्यास त्याबद्दल पूर्वइशारा देणे व नंतरच, त्यात बदल न झाल्यास राष्ट्रपतींची राजवट आणणे.

ऊ) ग्रामपंचायती, जिल्हा परिषदा इ. स्थानिक स्वराज्य संस्थांची नियमितपणे निवडणूक होत राहावी यासाठी यादी नं. २ मधील ५ वी बाब यादी नं. ३ मध्ये (समवर्ती यादीत) समाविष्ट करणे.

[उ व ऊ यांची सविस्तर चर्चा, आवश्यक न वाटल्याने, इथे केलेली नाही.]

संविधानात करावयाचे बदल असे थोडे आहेत. हे संविधान आमूलाग्र बदलावे, अशी ज्यांची अपेक्षा होती ते सरकारिया समितीच्या अहवालाने निराश झाले असणार यात संदेह नाही.

हे संविधान राबविण्यास केंद्र–राज्यांचे सहकार्य अनिवार्य आहे. त्यासाठी परस्परविरोधी आरोपप्रत्यारोपांची आतषबाजी, परस्परांबद्दल संशय थांबवावयास हवा. परस्परांबद्दल आदर, विश्वास, भरवसा हा सहकार्याचा पाया आहे. परस्परांना समजून घेण्याची बुद्धी हवी. ह्या गोष्टी परस्परांच्या वागणुकीतूनच सिद्ध व्हायला हव्या. शेवटी, " संविधानाला राबविणे हे पूर्णपणे संविधानाच्या ढाच्यावर अवलंबून असत नाही. संविधान विधिमंडळ, कार्यकारी शासनांग, व न्यायमंडळ अशांसारखी फक्त साधने राष्ट्राला देईल. राष्ट्राच्या या साधनांची कार्यवाहीची भिस्त जनतेवर व जनतेने आपल्या इच्छा व राजकारण चालविण्यास निवडलेल्या राजकीय पक्षावर आहे. गोष्टी चुकल्या तर आम्हाला निकृष्ट संविधान मिळाले म्हणून नव्हे तर माणूस अधम आहे हे त्याचे कारण आहे." [२६] हे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे उद्‌गार पुनःपुन्हा आठवावयास हवेत. (अपूर्ण)

## संदर्भ व टीपा–

१. Report of the commission on Centre-State Relations– Government of India, New Delhi, 1988. थोडक्यात सरकारिया समिती. इथले बहुतेक संदर्भ या समितीच्या अहवालाचे आहेत. भाग २, पृ. ८५८.

२. घटना समितीतील ४–११–१९४८ रोजी केलेले डॉ. आंबेडकर यांचे प्रतिपादन. चर्चाखंड VII, पृ. ३५–४४

३. भाग २, पृ. ८४९.

४. भाषावार प्रांतरचना केली हे चुकले तर नाही ? असे अजूनही चिघळत ठेवलेला कर्नाटक–महाराष्ट्र, पंजाब–हरियाणा सीमातंटा पाहून वाटायला लागते. खेडे हे घटक घेऊन सीमा आखायचे ठरवूनही कुंडूखेडे हे झारीतील शुक्रासारखे आडवे आले हे आपण पाहिले आहे. एकभाषेच्या आधारावरच तामिळ, पंजाबी राज्ये वेगळी होऊ पाहात आहेत. पंजाब्यांनी धर्माचाही आधार घेतला आहे.

धर्माच्या नावावर पाकिस्तान घेतले ही आपली चूक झाली व ती चूक सुधारूया असे पंडित जवाहरलाल नेहरू यांना सांगावे असे बॅ. जिना यांना शेवटीशेवटी वाटू लागले होते असे नुकतेच बाहेर आले आहे. कोणता तंटा किती ताणायचा याला मर्यादा हवी.

५. भाग २, पृ. ८६४.

६. भाग १, पृ. १३.

७. ,, , पृ. २७.

अनुक्रमणिका

८. ,, , पृ. ३० सर्वोच्च न्यायालयाचे दोन निकाल इथे उद्धृत आहेत.

९. या मंडळाबद्दलच्या सूचना पुढील लेखांकात.

१०. भाग २, पृ. १५१.

११. भाग १, पृ. ४१९.

१२. ,, , पृ. ४८८.

१३. ,, , पृ. ५७.

१४. — ,, —

१५. राज्यपालांच्या अशा वर्तणुकीसंबंधीची एक श्वेतपत्रिकाच कर्नाटक सरकारने सप्टेंबर १९८३ त प्रसिद्ध केली आहे. एखाद्या राज्याने अशी श्वेतपत्रिका प्रसिद्ध करणे कितपत औचित्यपूर्ण आहे हा प्रश्न अलाहिदा. श्री. रामकृष्ण हेगडे यांचा तो निबंध असता तर गोष्ट वेगळी होती.

महाराष्ट्रीय उदाहरण अगदी ताजे आहे. राज्यपालांनी राजकारणात लुडबूड करण्याची परंपरा आहे असे त्याचे समर्थन होऊ शकेल का ?

१६. भाग १, पृ. १२२.

१७. ,, पृ. १२५.

१८. ,, पृ. ११७–१८८.

१९. ,, पृ. १२८.

२०. ,, पृ. १२९.

२१. ,, पृ. १५७.

२२. ,, पृ. १५३.

२३. ,, पृ. १५३.

२४, ,, पृ. १५२.

२५. ,, पृ. २३९.

२६. घटनासमिती चर्चाखंड VII, पृ. ३५–४४.

○ ○ ○








# श्रीकृष्णचरित* (३)

भाऊ धर्माधिकारी

कृष्णाचे चरित म्हणजे कृती किंवा वागणूक भारतात कशी वर्णिली आहे ते आपण पाहात आहोत. युद्धापर्यंतचा एकही लहान-मोठा प्रसंग त्यात सोडला नाही. तसेच त्याचे बोलणे व उद्गारही सोडले नाहीत. आता आपण युद्धकाळात प्रवेश करीत आहोत. यात युद्ध चालू असताना आणि युद्ध संपल्यावर कृष्णाची वागणूक व विचार काय आढळतात ते पाहायचे. या सर्व वर्णनात गीताप्रसंग मी बाजूला ठेवला आहे हे वाचणाऱ्यांच्या लक्षात येईलच.

युद्ध सुरू झाले तेव्हाचा भीष्मपर्वाचा प्रारंभीचा भाग आपण 'चिकित्से'च्या १ ल्या प्रकरणात पाहिला. युधिष्ठिरादी पांडव कृष्णासह भीष्मांकडे गेले आणि युधिष्ठिराने प्रामाणिक बुद्धीने भीष्मांनाच त्यांचे मरण कसे होऊ शकेल हा प्रश्न विचारला आणि त्यांनीही तितक्याच प्रामाणिक बुद्धीने त्याचे उत्तर दिले. त्याप्रमाणे शिखंडीला पुढे करून अर्जुनाने भीष्मांवर बाणांची वृष्टी केली आणि भीष्म काही प्रतिकार न करता रणभूमीवर बाणांच्या शय्येवर पडले. त्या वेळी दुर्योधनाला भीष्मांनी पुन्हा समजावणीने सांगितले की,

> यावत् कृष्णो महाबाहुः स्वाधीनः कुरुसत्तम ।
> तावत् पार्थेन शूरेण संधिस्ते तात युज्यताम् ।।
> तावत् ते पाण्डवैर्वीरैः सौहार्द मम रोचते ।
> युद्ध मदन्तमेवास्तु तात संशाम्य पाण्डवैः ।।
> (भीष्म. १२१.४५ व ५०)

(जोवर कृष्ण आपला आवेश आवरून आहे तोवर शूर पार्थाशी संधी कर. तोवर वीर पांडवांशी तुझे सख्य झाले तर मला फार बरे वाटेल. माझ्या अंतानेच युद्ध संपू दे. बाबारे, पांडवांशी समेट कर). पण दुर्योधनाने ऐकले नाही.

भीष्मांना भेटल्यावर सर्वजण परतले. मग एकटा कर्ण त्यांना येऊन भेटला. भीष्मांना असे बाणांवर पडलेले पाहून त्याचे डोळे अश्रूंनी भरून आले. भीष्म डोळे मिटून पडलेले होते. तो त्यांना हाक मारून म्हणाला, "मी राधेय, नित्य तुमच्या डोळ्यांत खुपणारा, आपल्या भेटीला आलो आहे." भीष्मांनी हळूहळू डोळे उघडून त्याच्याकडे पाहिले आणि प्रेमाने हाक मारून त्याला जवळ बोलावून एकाच हाताने त्याला आलिंगन दिले. मग एकमेकांशी आपण कटू का बोललो ते एकमेकांना त्यांनी सांगितले. भीष्मांनी त्याच्या शौर्याची, औदार्याची आणि ब्राह्मणभक्तीची प्रशंसा केली आणि ते म्हणाले, "दैवाची गती पुरुषप्रयत्नांनी थांबविता येत नाही. कर्णा, पांडव हे तुझे सख्खे भाऊ आहेत. माझे प्रिय तुला करावेसे वाटत असेल तर त्यांच्या सोबत जा. माझ्या मरणाने हे वैर संपू दे. आणि जगातले सर्व राजे कुशल राहू देत."

कर्ण म्हणाला, "पितामह, मी कौन्तेय आहे हे मला माहीत आहे. पण दुर्योधनाने दिलेले ऐश्वर्य उपभोगल्यानंतर त्याच्याशी बेइमानी करणे मला शक्य नाही. जसा वासुदेव पांडवांशी निष्ठा राखून आहे तसाच मीही दुर्योधनाशी एकनिष्ठ आहे. मी धन, बायको, मुले, हे शरीर सर्वकाही दुर्योधनाप्रीत्यर्थ टाकलेले आहे. मी क्षत्रिय आहे. माझे मरण व्याधीने होऊ नये. पांडवांशी होणारे हे महाभयंकर वैर आता टाळता येणार नाही. मी स्वधर्माशी निष्ठा राखून धनंजयाशी युद्ध करीन. माझ्याकडून आपल्याला रागाने, अविचारीपणाने जे वाईट, उद्धटपणाचे बोलले गेले, केले गेले त्याची आपण मला क्षमा करावी."

भीष्म म्हणाले, "कर्णा, हे महाभयानक वैर जर तुला सोडून देणे शक्य नसेल तर क्रोध आणि मनाची

---

* या लेखाचा पहिला भाग मे-जून ८८ या विशेषांकात आणि दुसरा भाग ऑगस्ट ८८ च्या अंकात प्रसिद्ध झाला. (ऑगस्ट ८८ अंकातील दुसरा भाग अंतिम असल्याचे नजरचुकीने तळटीपेत म्हटले गेले.) या अंकात या लेखाचा तिसरा व अंतिम भाग प्रसिद्ध होत आहे. —संपादक

अनुक्रमणिका

क्षुद्रता टाकून देऊन स्वर्गाची इच्छा धरून कर्तव्यकर्म म्हणून सज्जनांच्या पावलावर पाऊल टाकून यथाशक्ती आणि उत्साह असेल त्याप्रमाणे लढ. माझी तुला अनुमती आहे. क्षत्रियाला धर्म्य युद्धाखेरीज दुसरे काहीही श्रेयस्कर नाही..." कर्ण भीष्मांना वंदन करून परत गेला. ( भीष्म. १२२.१–३९ )

अभिमन्यू चक्रव्यूहात एकटा लढत असता अनेक योद्धयांनी त्याला घेरून त्याच्यावर हल्ला केला, तरी न डगमगता तो युद्धकौशल्याने लढत असता जयद्रथाने त्याचा वध केला. हा समाचार अर्जुनाला, तो संशप्तकांशी लढून व त्यांना मारून शिबिरात परतला तेव्हा, कळला. तो ऐकताच त्याचा शोक अनावर झाला. तो कृष्णाला म्हणाला, "रणक्षेत्रात असतानाच ही गोष्ट तू मला का सांगितली नाहीस ?" त्याचे सांत्वन करून कृष्ण म्हणाला, "युद्धाला पाठ दाखवून न फिरणाऱ्या शूरांचा हाच मार्ग असतो–विशेषतः युद्धावरच ज्यांची उपजीविका त्या क्षत्रियांचा. मागे न फिरणाऱ्या शूरांचे रणात मरण अटळ असते, तीच त्यांची गती असते. या मरणाने अभिमन्यू पुण्यवंतांच्या लोकांना गेला यात संशय नाही. सर्व वीरांची शेवटी संग्रामात मृत्यू यावा हीच कामना असते. वीरा, पूर्वीच्या धर्मकारांनी क्षत्रियांचा रणात मृत्यू हा सनातन धर्म घालून दिला आहे. म्हणून तू शोक करू नकोस."

वास्तविक अभिमन्यूच्या जन्मापासून हा भाचा कृष्णाचा अत्यंत लाडका होता, त्यामुळे कृष्णालाही त्याच्या मरणाचे पराकाष्ठेचे दुःख झालेले असणार. पण ज्या शब्दांनी त्याने अर्जुनाचे सांत्वन केले ते विचार–म्हणजे क्षात्रधर्माचे विचार–तो निष्ठेने मानीत असल्यामुळे रणात पडलेल्या लाडक्या मुलाविषयीसुद्धा शोक करणे त्याने उचित मानले नाही. रणात मेला तो स्वर्गाचा अधिकारी ही त्याची पक्की श्रद्धा. क्षत्रियधर्माविषयीची कृष्णाची जाज्वल्य निष्ठा या उदाहरणातून प्रकट होते.

अर्जुनाने जयद्रथाला दुसऱ्या दिवशीच्या युद्धात सूर्यास्त होण्याच्या आत मारण्याची घोर प्रतिज्ञा जगजाहीरपणे केली. आता कौरव जयद्रथाचे संरक्षण कडेकोट बंदोबस्त ठेवून करणार आणि त्यामुळे अर्जुनाला आपली प्रतिज्ञा पार पाडणे कठीण जाणार, आणि जर जयद्रथ सूर्यास्तापूर्वी अर्जुनाच्या हाती मारला न गेला तर अर्जुन स्वतःला अग्नीत जाळून घेणार, हा सगळा विचार कृष्णाच्या मनात सुरू झाला. अर्ध्या रात्रीच जागा होऊन त्याने आपला सारथी दारुक याला बोलावले आणि तो त्याला म्हणाला, "दुर्योधनाची सगळी कोटी कोटी सैनिकांची सेना उद्या जयद्रथाच्या रक्षणाकरिता तयार असणार. म्हणून अर्जुन ज्यायोगे उद्या सूर्यास्तापूर्वी जयद्रथाला मारील अशी व्यवस्था मी करू इच्छितो. अर्जुनाहून मला माझी पत्नी, मित्र, ज्ञातिबंधू कोणीकोणी प्रिय नाहीत. अर्जुन जर या जगातून गेला तर, दारुका, मी हे जग क्षणभरही पाहू शकणार नाही. अर्थात तसे होणारही नाही. मी अचानक कर्ण–दुर्योधनांसकट सर्व शत्रूंना अर्जुनाकरिता मारून जय मिळवीन. उद्या या महारणात सगळे माझा पराक्रम बघू देत. म्हणून दारुका, आज पहाटे माझा रथ सर्व युद्धसाहित्यानिशी बरोबर सिद्ध करून घेतावेताने घेऊन जा. रथाला माझा ध्वज लावून अंगात कवच चढवून रथाला घोडे जुंपून तू एक जागा योजून तेथेच थांब आणि माझ्या शंखाचा गंभीर निनाद ऐकताच वेगाने माझ्याकडे ये. एकाच दिवसात मी माझ्या या आतेभावांचा सारा क्रोध आणि दुःख नाहीसे करीन. कौरव पाहात असतानाच अर्जुन जयद्रथाला मारील असा प्रयत्न मी करणार आहे." (द्रोण. ७८. २१–४२)

युधिष्ठिराला भेटायला कृष्ण येतो तेव्हा युधिष्ठिर त्याला "अर्जुनाची प्रतिज्ञा सत्य होईल असे तूच करू शकशील, तसे तू कर" असे सांगतो. अर्जुन त्याच्या भेटीला येतो, त्याच्या मस्तकाचे प्रेमपूर्वक अवघ्राण करून युधिष्ठिर त्याला म्हणतो : "अर्जुना, या युद्धात तुझा विजय निश्चित आहे. तुझी मुद्रा आणि कृष्णाची प्रसन्नता बघून मला तसे वाटते."

मग कृष्ण एखाद्या सामान्य सारथ्याप्रमाणे अर्जुनाचा रथ सज्ज करतो आणि रथ तयार असल्याचे अर्जुनाला येऊन सांगतो. अर्जुन आपल्या शस्त्रास्त्रांनिशी त्यावर चढतो आणि त्याच्या मागोमाग कृष्ण आणि सात्यकी चढतात. कृष्ण घोडयांचे लगाम हाती घेताच युधिष्ठिर सात्यकीला म्हणतो, "अर्जुनाचे रक्षण तुझ्याकडे, कृष्णासारखाच तू महापराक्रमी आहेस."

अर्जुन कौरवसैन्यात घुसत असताना दुर्योधनाचे भाऊ आणि इतर योद्धे त्याला अडवायला पुढे आले, त्यांना पिटाळून लावीत तो द्रोणाचार्यांच्या पुढे येऊन ठेपला. सैन्याच्या व्यूहाच्या तोंडाला सेनापती द्रोण उभे होते. कृष्णाची अनुमती ... हात जोडून



त्यांना म्हणाला, " ब्राह्मणश्रेष्ठ, माझ्याविषयी शुभ-कामना मनात धरून मला कल्याणाचा आशीर्वाद द्या. आपल्या कृपेने मी या अवघड रचना असलेल्या सैन्यात शिरू इच्छितो. आपण मला पित्यासमान आणि धर्मराजासमान आहा, नव्हे कृष्णासमान पूज्य आहात हे मी सत्य सांगतो. आपण अश्वत्थाम्याचे जसे रक्षण कराल तसे माझेही करावे. आपल्या कृपाप्रसादाने मी आज सिंधुराज जयद्रथाला रणात मारू इच्छितो. माझ्या प्रतिज्ञेचे आपण रक्षण करावे. "

यावर द्रोणाचार्य हसत म्हणाले, " मला जिंकल्या-शिवाय जयद्रथाला जिंकणे अर्जुना, तुला शक्य नाही ", असे म्हणत त्यांनी अर्जुनाच्या रथावर बाणांचा मारा सुरू केला. अर्जुनाचे द्रोणाशी घनघोर युद्ध लागले. द्रोणांचे सारे सैन्य अर्जुनाने पळवून लावले.

द्रोण-अर्जुन यांचे हे असे तुंबळ युद्ध चाललेले पाहून महाबुद्धिमान कृष्ण, अर्जुन येथेच गुंतून न पडता पुढचे कार्य कसे साधील, याचा विचार करू लागला. तो अर्जुनाला म्हणाला, " पार्था, पार्था, आपला काळ चालला आहे तो गमावता कामा नये. द्रोणांना सोडून दे. आपण पुढे झटकूया, ते फार मह-त्त्वाचे आहे. " अर्जुन म्हणाला, " तुझी इच्छा असेल तसे कर. "

मग द्रोणांना उजवी घालून बाणांचा वर्षाव करीत अर्जुन मागे वळला. तेव्हा द्रोण त्याला " कुठे चाल-लास ? शत्रूला न जिंकताच निघून चाललास हे कसे ? " असे त्यांनी विचारले. तेव्हा अर्जुन म्हणाला :

" गुरुर्भवान् न मे शत्रुः शिष्यः पुत्रसमोऽस्मि ते ।
न चास्ति स पुमाँ ल्लोके यस्त्वां युधि पराजयेत् ॥"

( आपण माझे शत्रू नाही, गुरू आहात आणि मी आपला शिष्य पुत्रासारखा आहे. आपल्याला युद्धात जिंकेल असा या जगात एकही पुरुष नाही. )

एवढे बोलून तो जयद्रथाचा वध करण्याच्या उता-वळीने कौरवसैन्यावर तुटून पडला. त्याच्या साह्याला पांचालवीर पाठोपाठ गेले. अर्जुन बाणांचा मारा करीत पुढे पुढे चालला होता. अनेक वीर राजे प्रभावीपणे प्रतिकार करून त्याला अडवीत होते. आतापर्यंत शर्थीने लढून तो वराच थकला होता. तो थकला आहे असे पाहून कौरवसेनेने त्याला चहू बाजूंनी वेढले. ते पाहून अर्जुन कृष्णाला म्हणाला, " हे घोडे बाणांनी पीडले आहेत आणि धावून थकले आहेत आणि सिंधुराज तर अजून दूर आहे. तेव्हा यापुढे काम करणे तुला योग्य वाटते ? पाहिजे तर घोड्यांना सोड आणि त्यांच्या अंगातले बाण काढून टाक." कृष्ण म्हणाला, " तुझ्या-प्रमाणेच मला वाटते." तेव्हा अर्जुन रथाखाली उतरला आणि हाती गांडीव घेऊन पहाडासारखा स्थिर उभा राहिला. त्याला खाली उतरलेला पाहून जयेच्छू क्षत्रिय 'हीच आपली संधी' असे समजून आरडत ओरडत त्याच्याकडे चालले. पण अर्जुनाने आपल्या बाहुबलाने त्या सर्वांना थोपवून धरले. इकडे कृष्णाने रथाचे घोडे सोडले व त्यांना पाणी पाजण्याकरिता तो पाणी पाहू लागला. पण पुरेसे पाणी त्याला कुठे दिसले नाही. तसे त्याने अर्जुनाला सांगताच अर्जुनाने गडबडून न जाता भूमीत बाण मारला आणि पाण्याचे लहानसे तळे निर्माण केले; तसेच बाणांच्या आच्छादनाखाली एक घर निर्माण केले. ( द्रोण. ९९ )

कृष्णाने रथाचे घोडे त्या बाणांच्या आच्छादना-खाली नेले. तेथे त्याने घोड्यांच्या अंगात घुसलेले बाण काढून टाकले. अर्जुन भूमीवर आपल्या पायांवर उभा असतानाही सगळे वीर राजे त्याचे निवारण करू शकले नाहीत. अर्जुनाचे आणि कृष्णाचे अशी ही दोन अद्भुत कृत्ये पाहून कौरवांनी त्यांची वाहवा केली. असे अद्भुत कर्म पूर्वी कधी घडले नाही, पुढे कधी घडणार नाही. 'रणातच युद्ध चालू असता रथाचे घोडे कोण सोडू शकतो ?' असे ते म्हणाले. कृष्णाने घोड्यांना विश्रांती दिली, त्यांची ग्लानी दूर केली, त्यांच्या जखमांवर उपचार केले. कृष्ण हा घोड्यांची सेवा करण्यात कुशल होता. त्याने हे सर्व करून त्यांना पाणी पाजले. अशा रीतीने ताजेतवाने करून कृष्णाने त्यांना परत रथाला जोडले आणि झटकन् तो रथ अर्जुनाकडे नेला. अर्जुन पुन्हा त्या रथात बसला आणि कौरवक्षत्रियांना जिंकत जयद्रथाच्या दिशेने चालला.

कृष्णाने त्या सैन्यसागरात घोडे घुसविले आणि आपला पांढराशुभ्र शंख मोठ्याने वाजविला. त्याने इतक्या वेगाने रथ हाणला, की अर्जुनाने पुढे सोडलेले बाण मागे पडत चालले. कौरवसेनेने अर्जुनाला वेढा घातला. अर्जुन थोडा थांबला. एवढ्यात दुर्योधन त्वरा करीत त्याच्या पाठोपाठ तेथे आला. त्या वेळी इतकी धूळ उडत होती, की सूर्य झाकला गेला आणि योद्ध्यांना अर्जुन व कृष्ण दिसेनासे झाले. (द्रोण. १००)

कौरवांच्या सेनाधिपतींना वाटत होते, की अर्जुन सेनेच्या मोहऱ्याला उभे असणाऱ्या द्रोणांना ओलांडू शकणार नाही. पण त्यांची ती अपेक्षा फोल ठरून अर्जुनाचा रथ पुढेपुढेच जात चालला. तशी जयद्रथ वाचण्याची त्यांची आशा क्षीण झाली. एवढ्यात दुर्योधन अर्जुनाचा रथ ओलांडून पुढे सरला. त्याला पाहून साऱ्या कौरवसैन्यात उत्साह संचरला. त्याला बघून कृष्ण म्हणाला, "अर्जुना, संधी आली. सदोदित बांधवांचा द्वेष करीत आलेल्या दुर्योधनाशी युद्ध करण्याची ही संधी चालून आली आहे. आता हा तुझ्या बाणांच्या टप्प्यात आला आहे. त्याचा प्राण जाईल असे कर. याला तू मारलेस, की सारे सैन्य अनाथ होईल. त्याचा भेद कर. या दुरात्म्यांचे दुर्योधन हा मूळ, तेच तू नष्ट कर आणि वैराचे अवभृथ (शेवटचे) स्नान कर."

अर्जुनाने सांगितल्यावरून कृष्णाने रथ दुर्योधनाकडे नेला आणि ते समोरासमोर आले. तेव्हा दुर्योधनाने न भिता त्यांना थोपविले. कृष्णार्जुनांनी आपले दिव्य शंख फुंकताच सर्व कौरव भिऊन गेले व 'आता राजा मरणार' असे म्हणू लागले. हा लोकांचा गलका ऐकून दुर्योधन म्हणाला, "अरे भिता काय? या दोघांना मी मृत्यूच्या तोंडी देतो पाहा." असे म्हणून तो अर्जुनाला म्हणाला, "पार्था, जर पांडूच्या पोटचा असशील तर जे पार्थिव अस्त्र तू शिकला आहेस ते माझ्यावर सोडून दाखव. तुझे आणि केशवाचे सुद्धा बळ काय आहे ते पाहू. तू मोठे पराक्रम केलेस म्हणतात, आता ते प्रत्यक्षच दाखव." (द्रोण. १०२)

दुर्योधनाशी अर्जुनाचे युद्ध जुंपले. अर्जुन उत्तम उत्तम बाण सोडीत होता पण ते दुर्योधनाच्या अंगावर लागून गळून पडत होते. तेव्हा कृष्ण म्हणाला, "अभूतपूर्व अशी ही घटना मी पाहात आहे. अर्जुना, तुझ्या धनुष्यात जीव आहे ना? धनुष्य धरलेली मूठ पूर्वीसारखीच घट्ट आणि बाहूंचे बळ पूर्वीसारखेच आहे ना? तुझा आणि या तुझ्या शत्रूचा काळ तर आज फिरला नाही ना? वज्रासारखे धारदार असलेले शत्रूचे शरीर फोडणारे भयंकर बाण निकामी होत आहेत, याहून विडंबना ती कोणती?"

अर्जुन म्हणाला, "मला वाटते, की द्रोणांनी आपली बुद्धी चालवून माझे बाण याच्यावर न चालतील असे कवच याला घालायला लावले असावे, या कवचात त्रैलोक्याची शक्ती भरलेली आहे. एकटे द्रोणच हे जाणतात आणि त्यांच्याकडून मला ते कळले आहे. हे कवच बाणांनी फोडणे शक्य नाही. म्हणूनच हा दुर्योधन न भिता इथे उभा आहे. पण या ठिकाणी जे करणे अवश्य असे कार्य आहे ते याला माहीत नाही. हे कवचाचे लेणे तो स्त्रीप्रमाणे अंगावर वागवीत आहे. त्याने याचे जरी रक्षण केले असले, तरी आता माझ्या बाहूंचे आणि धनुष्याचे काय बळ आहे ते पाहा", असे म्हणून अर्जुनाने मानवास्त्राच्या मंत्राने भारून बाण मारले. त्या बाणांचे अश्वत्थाम्याने निवारण केले. त्या अस्त्राचा प्रयोग पुन्हा अर्जुन करू शकत नव्हता. मग दुर्योधनाने अर्जुनावर बाण टाकले. असे त्यांचे युद्ध सुरू झाले. अर्जुनाने नाना प्रकारचे बाण मारून त्याला हतबल करून टाकले आणि दुर्योधनाने युद्धातून पळ काढला. इतरांनी अर्जुनाला घेरले तेव्हा अर्जुनाने बाणांचा वर्षाव केला आणि कृष्णाने मोठमोठ्याने शंख फुंकला. त्यायोगे अनेक सैनिक भूमीवर पडले. जयद्रथाचे रक्षण करणारे महाधनुर्धारी वीर मोठमोठ्याने गर्जना करू लागले. (द्रोण. १०३)

जयद्रथापर्यंत पोचण्याला प्रतिबंध करणाऱ्या अनेक सैन्यांना अर्जुनाने पराभूत केले. तो बाण घेतो केव्हा, लावतो केव्हा आणि सोडतो कुठे आणि केव्हा हे समजत नव्हते. असे करीत करीत त्याने जयद्रथापर्यंत मजल मारली आणि त्याला पासष्ट बाणांनी विद्ध केले. आता त्या दोघांचे युद्ध सुरू झाले. या वेळी सूर्य त्वरेने मावळतीकडे जात चाललेला दिसला. तेव्हा कृष्ण अर्जुनाला म्हणाला, "ज्या सहा वीरांनी जयद्रथाला वेढले आहे त्यांना मारल्याशिवाय याला मारणे शक्य होणार नाही. म्हणून मी आता एक युक्ती करतो. सूर्यावर आवरण घालण्याची मी योगक्रिया करतो. तो अस्ताला गेला असे एकट्या जयद्रथालाच दिसेल. आपण आता जिवंत राहिलो असा हर्ष मानून तुझा मृत्यू पाहण्याकरिता तो बेसावध राहील. तेवढी संधी तू साध. सूर्य मावळला अशी कल्पना तू करू नकोस." अर्जुनाने होकार देताच कृष्णाने सूर्यावर अंधाराचे आवरण निर्माण केले.

योगी योगेन संयुक्तो योगिनामीश्वरो हरिः ।
सृष्टे तमसि कृष्णेन गतोऽस्तमिति भास्करः ।।

(योगी हरी हा योगेश्वर होता, त्या कृष्णाने योगाने संयुक्त होऊन अंधारात सूर्य अस्ताला गेला अशी स्थिती उत्पन्न केली). सूर्य अस्ताला गेला असे समजून

सर्व कौरवसैनिकांना हर्ष झाला. जयद्रथ सूर्याकडे तोंड वर करून पाहू लागला तेव्हा कृष्ण अर्जुनाला म्हणाला, "पार्था, तुझे भय टाकून देऊन हा जयद्रथ सूर्याकडे पाहात आहे. हीच वेळ या दुरात्म्याचा वध करण्याची आहे". हे ऐकताच अर्जुनाने मधले योद्धयांचे अडथळे दूर करीत जयद्रथाकडे धाव घेतली. लखलखणाऱ्या ज्वालांरूपी जिभांच्या अग्नीप्रमाणे त्याला जवळ आलेला पाहून जयद्रथाच्या रक्षणकर्त्यांनी अर्जुनावर बाणांचा वर्षाव केला. पण ते सर्व उडवून लावीत अर्जुनाने त्यांना पळवून लावले. त्या वेळी धूळ व अंधार यांनी सर्व योद्धयांचे डोळे इतके झाकले गेले, की ते एकमेकांनाही ओळखतनासे झाले. त्या स्थितीत अर्जुनाने एका बाणावर वज्रास्त्राचे अभिमंत्रण करून तो धनुष्यला जोडला. कृष्ण म्हणाला, "सूर्य आता मावळतीकडे कलला आहे. तू या बाणाने जयद्रथाचे मस्तक असे उडव, की ते या कुरुक्षेत्राच्या बाहेर बसलेल्या त्याच्या पित्याच्या मांडीवर जाऊन पडेल." अर्जुनाने बाणाने जयद्रथाचे डोके उडविले आणि कृष्णाने आपली योगमाया काढून घेतली. तेव्हा कौरवांना कळून आले, की ही कृष्णाने उत्पन्न केलेली माया होती.

अर्जुनाची प्रतिज्ञापूर्ती करण्याकरिता कृष्णाने योगमाया निर्माण केली वगैरे सर्व वर्णन पुराणिकांच्या कल्पनांचा खेळ आहे. येथेच सबंध महाभारतात अगदी प्रथम कृष्णाला योगसामर्थ्य होते व तो योगेश्वर होता असे शब्द योजलेले आढळतात. पण पुराणिकबुवांच्या या कथनात चूक अशी आढळते की, कृष्ण अर्जुनाला 'आपण एक योगक्रिया करून एकटया जयद्रथालाच सूर्य मावळला वाटेल असे करतो' असे म्हणतो ("अस्तंगत इति व्यक्तं द्रक्षत्येकः स सिन्धुराट्"– द्रोण. १४५.६४); पण पुढे वर्णनाच्या पाल्हाळात वरंगळत 'सर्वांनाच सूर्य दिसेनासा झाला' ("ते प्रहृष्टाः रणे राजन् ना पश्यत् सैनिका रविम्"– द्रोण. १४५.६९) असे कवी सांगतो. ही चूक व्यासांच्याकडून घडण्याचा संभव वाटत नाही. 'योग' या शब्दाचा 'कपट', 'युक्ती', 'डाव' असाही अर्थ आहे. अशी योगक्रिया कृष्णाने जयद्रथावर केली तर सैनिकांनाही सूर्य कसा दिसेनासा झाला? म्हणून हा जयद्रथ प्रकरणाचा सर्व भाग क्षेपक असावा असे अनुमान होते आणि म्हणून कृष्णाचे योगेश्वरत्वही त्यांबरोबरच क्षेपक ठरते. दुसरी गोष्ट अशी की, जो अर्जुन कृष्णाने आपल्याला आपण जिवंत असताना वाचवावे याच्या विरुद्ध होता (पाहा द्रोण. अ–२२–२३) तो आपल्या शत्रूला मारण्याच्या कामी कृष्णाला असला कपटप्रयोग करू देईल आणि त्या कपटप्रयोगाच्या आड राहून आपले शौर्य गाजवील (?) ही गोष्ट मुळातच त्याच्या पुरुषार्थाला आणि स्वाभिमानाला न शोभण्यासारखी आहे हे या पुराणिकबुवांच्या ध्यानीच आले नाही. व्यासांच्या तेजस्वी वीरपुरुषाला आपण असल्या भाबडया कथांनी कलंकित करीत आहो हे पुराणिकाच्या लक्षात येणे कठीणच!

द्रोणपर्वाच्या १४७ व्या अध्यायात कृष्णाने अर्जुनाचा कर्णाशी घडणारा संग्राम टाळला तो प्रसंग वर्णिला आहे. कर्ण अर्जुनावर चाल करून आला. तो येत आहे असे पाहून सात्यकी आणि द्रुपदपुत्र त्याला आडवे गेले. सात्यकीला वाचविण्याकरिता अर्जुनाने कृष्णाला तिकडे रथ ने म्हटले, पण कृष्ण म्हणाला, "सात्यकी एकटा कर्णाला पुरा पडणारा आहे. शिवाय त्याच्या साहाय्याला द्रुपदपुत्र असल्यावर तर चिंताच नाही. या वेळी तुझा कर्णाशी संग्राम होणे इष्ट नाही. त्याच्यापाशी असलेली वासवी नावाची महाबलशाली शक्ती त्याने तुझ्याकरिता राखून ठेवली आहे. म्हणून कर्णाशी सात्यकीलाच जसे लढायचे तसे लढू दे."

जयद्रथाचा वध केल्याबद्दल कृष्णाने अर्जुनाला आलिंगन दिले आणि त्याची पाठ थोपटली. अर्जुन म्हणाला, "कृष्णा, हे तुझ्या कृपेचे फळ. तू ज्यांचा रक्षणकर्ता त्यांचा जय होणारच. हा तुझाच विजय आहे."

युधिष्ठिराचे द्रोणाशी युद्ध जुंपले. युधिष्ठिराने आपल्या युद्धकौशल्याने त्यांना मूर्च्छित केले. शुद्धीवर येताच त्यांनी वायवास्त्राचा प्रयोग केला. युधिष्ठिराने दिव्यास्त्राने तो अपयशी केला आणि द्रोणांचे धनुष्य मोडून टाकले. त्यांनी दुसरे धनुष्य घेतले, एवढ्यात कृष्णाने येऊन युधिष्ठिराला सांगितले, "द्रोणाशी चाललेले युद्ध थांबव. तुला ते बंधात टाकून घेऊन जाण्याच्या प्रयत्नात आहेत. यांच्याशी तू लढणे मला अनुरूप वाटत नाही. राजाने राजाशीच लढावे, राज्य नसलेल्याशी युद्ध करणे योग्य नाही. तू येथून जा." (द्रोण. १६२.५०) युधिष्ठिराने क्षणभर विचार केला आणि तो भीमाच्या साहाय्याला गेला.

कर्ण आणि द्रोणाचार्य यांनी लढण्याचा कहर केला. कर्णाने धृष्टद्युम्न व इतर द्रुपदपुत्र यांचा पराभव केला. आपली सेना पळत सुटली आहे हे पाहून युधिष्ठिर अर्जुनाला म्हणाला, "कर्णाला मारण्याकडे लक्ष दे." त्यावर कृष्ण म्हणाला, "कर्ण हा इंद्रासारखा आज अतिमानुष पराक्रम करीत फिरत असलेला मला दिसत आहे. अर्जुना, एक तू किंवा घटोत्कच यांच्याशिवाय त्याला संग्रामात अडवू शकेल असा दुसरा कोणी नाही. पण कर्णाशी रणात भिडण्याचा तुला योग्य असा काळ अजून आलेला नाही. तुझ्यासाठीच केवळ राखून ठेवलेली वासवी शक्ती कर्णापाशी आहे. ती त्याचे रक्षणही करते आणि त्याचे उग्र रूप टिकविते. कर्णाशी लढण्याकरिता घटोत्कचाला जाऊ द्या. तो तुमच्यावर प्रेम करणारा तुमचा हितैषी आहे. तो रणात कर्णाला जिंकेल याविषयी मला संशय नाही."

कृष्णाची धोरणे किती दूरवर पाहून असायची हे यावरून दिसते. कर्णाला त्याची ती शक्ती इतरत्र खर्च करायला लावण्याकरिता त्याने घटोत्कचाला पुढे सारले आणि अर्जुनाला वाचविले. हे धोरण इतर कोणाही पांडवात किंवा पांडवांच्या सल्लागारांत नव्हते. एकट्या कृष्णाच्याच लक्षात राहिलेली ही गोष्ट होती.

मग घटोत्कचाशी बोलून कर्णाबरोबर लढण्याकरिता त्याने त्याला तयार केले. "आपल्या मायेने मध्यरात्री कर्णाला तू रणात मार, तोवर पांडव तिकडे धृष्टद्युम्नाच्या सेनापतित्वाखाली द्रोणाशी लढतील" असे त्याने त्याला सांगितले.

कर्ण–घटोत्कच युद्धात घटोत्कचाच्या पराक्रमाने कौरवसेना भराभर मरू लागलेली पाहून कौरवांच्या आग्रहावरून कर्णाने अर्जुनासाठी राखून ठेवलेली शक्ती नाइलाजाने घटोत्कचावर सोडली. तिचा प्रहार होताच घटोत्कच मरून पडला. त्याच्या मरणाचे सर्व पांडवांना अतिशय दुःख झाले, पण कृष्णाला अतिशय आनंद होऊन त्याने अर्जुनाला छातीशी धरले. मोठमोठ्याने गर्जना करीत लगाम खेचून धरून तो आनंदाने नाचू लागला. मग पुन्हा अर्जुनाला मिठी मारून व त्याच्या पाठीवर वारंवार थोपटीत तो रथाच्या मागच्या आसनावर बसून गर्जना करू लागला. कृष्णाला इतका आनंदित झालेला पाहून अर्जुनाला बरे वाटले नाही. तो त्याला म्हणाला, "कृष्णा, हा तुझा अतिहर्ष मला अस्थानी वाटतो. इकडे घटोत्कच मेला आणि तू हसत सुटला आहेस हे काय? अर्थात तुला ज्या अर्थी हर्ष वाटत आहे त्या अर्थी त्याचे तसेच काही बलवत्तर कारण असले पाहिजे. ते कोणते ते मला सांग."

कृष्ण उत्तरला, "माझ्या अत्यंत हर्षाचे कारण तुला पाहिजे? कर्णाकडे फक्त तुझ्या वधासाठी असलेली वासवी शक्ती घटोत्कचाने स्वतःवर ओढवून घेतल्याने आता रणात कर्णाचा वध निश्चितच झाला समज. ती शक्ती त्याच्यापाशी असताना त्याच्यापुढे उभा राहील असा कोण या जगात आहे? आता कर्णाचे कवच गेले, कुंडले गेली आणि शक्तीही गेली. आता कर्ण विझलेल्या अग्नीसारखा मला वाटतो. असे असले तरी कर्ण इतका पराक्रमी आहे, की तुझ्याशिवाय दुसरा कोणी त्याला मारू शकणार नाही. कर्ण हा ब्राह्मणभक्त, सत्यवादी, तपस्वी, व्रतनिष्ठ, शत्रूवरसुद्धा दया करणारा आहे. म्हणूनच त्याला 'वृष' (सर्वश्रेष्ठ पुरुष) म्हणतात. त्याची कवच-कुंडले आणि शक्ती नष्ट झाल्यामुळे तो आता सामान्य योद्धा झाला आहे." (द्रोण. १८०)

द्रोणाचार्यांनी पराक्रमाची शर्थ केली. त्यांच्यापुढे पांडवसैन्य भराभर नष्ट होऊन विरळ होऊ लागले. कर्ण त्यांचे रक्षण करीत होता म्हणून भीम त्याच्यावर चालून गेला. अर्जुनाने इतर कौरववीरांना द्रोणांपासून पळवून लावण्यास सुरुवात केली तरी द्रोणांनी पांचालसैन्याचा फडशा पाडला. पांडवांना जयाची आशा वाटेना. अर्जुनाखेरीज त्यांच्याशी युद्ध करायला कोणी टिकेना आणि अर्जुन त्यांच्याशी मनापासून युद्ध करीत नाही असे पांडवांना वाटू लागले. द्रोणांच्या बाणांनी ते सगळे पीडित झालेले पाहून कृष्ण अर्जुनाला म्हणाला, "द्रोणांच्या हाती धनुष्य आहे तोवर इंद्रसुद्धा त्यांना जिंकू शकणार नाही. त्यांनी शस्त्र हातातून खाली टाकले तरच त्यांना कोणी मारू शकेल.

आस्थीयतां जये योगो धर्ममुत्सृज्य पाण्डवाः ॥
यथा वः संयुगे सर्वान् न हन्याद् रुक्मवाहनः ।
अश्वत्थाम्नि हते नैष युध्येदिति मतिर्मम ॥
तं हतं संयुगे कश्चिदस्मै शंसतु मानवः । ... "

(द्रोणांकडून रणात सर्वांचा संहार होऊ नये याकरिता आता पांडवांनी धर्म सोडून जयाच्या दृष्टीने कपटाचा आश्रय घ्यावा. अश्वत्थामा मेला तर ते युद्ध करणार नाहीत असे मला वाटते. तो युद्धात मेला असे कोणी-तरी त्यांना येऊन सांगावे).

अनुक्रमणिका

ही गोष्ट अर्जुनाला रुचली नाही, पण इतरांना ती पसंत पडली. मग भीमाने आपल्याच सैन्यातील एका अश्वत्थामा नावाच्या हत्तीला गदेने मारून टाकले. तो हत्ती मालवराजा इंद्रवर्मा याचा होता. मग भीम संकोचत संकोचत द्रोणांजवळ जाऊन मोठ्याने ओरडला : "अश्वत्थामा मेला!"

भीमाच्या तोंडचे ते कटू शब्द कानी पडताच द्रोणांचे अवसान गळाले. तरी त्यांना खात्री वाटेना. आपला बलवीर्यसंपन्न पुत्र असा मारला जाणार नाही अशी त्यांना खात्री होती. म्हणून त्यांनी पुन्हा आपले धैर्य एकवटले आणि ते धृष्टद्युम्नावर तुटून पडले. त्यांनी पांचाल नरेशांचा, मत्स्यराजांचा आणि सृंजयांचा वध केला. पण भीमसेनाच्या त्या आरोळीने त्यांचे चित्त द्विधा झाले होते. त्या वृत्ताविषयीची खात्री करून घेण्याकरिता ते व्यथित अंतःकरणाने युधिष्ठिराकडे गेले आणि त्यांनी त्याला विचारले, "माझा मुलगा मारला गेला की मारला गेला नाही?" युधिष्ठिर कधी खोटे बोलणार नाही अशी त्यांच्य मनाची खात्री होती. म्हणून दुसऱ्या कोणाला न विचारता त्यांनी त्यालाच विचारले. कृष्ण त्या वेळी त्याच्या जवळच होता. पांडवांना या लोकातून नष्ट करू इच्छिणाऱ्या त्या सेनाधिपतीचा हेतू जाणून तो व्यथित अंतःकरणाने धर्मराजाला म्हणाला, "जर द्रोण आवेशाने आणखी अर्धा दिवस युद्ध करतील तर मी तुला खरोखर सांगतो तुझी सारी सेना नष्ट होऊन जाईल. म्हणून तू आम्हांला द्रोणांपासून वाचव. या वेळी असत्याची महती सत्याहून अधिक आहे. आपला जीव वाचविण्याकरिता जर कोणी खोटे बोलला तर त्याला खोटेपणाचा दोष लागत नाही."

त्या दोघांचे असे बोलणे होत असता भीमाने युधिष्ठिराला आपण अश्वत्थामा हत्ती मारून 'अश्वत्थामा मेला' अशी आरोळी ठोकल्याचे सांगितले आणि तो म्हणाला, "जय इच्छिणाऱ्या कृष्णाचे सांगणे तू ऐक, की द्रोण मेलेच समज. तू असे बोललास की हा द्विजश्रेष्ठ लढणारच नाही." हे भीमाचे बोलणे ऐकल्यावर आणि कृष्णाच्या सांगण्याने प्रवृत्त होऊन, आपण असत्य बोलत आहो याचे भय वाटत असताना जयाच्या आशेने गुंतून युधिष्ठिर अस्फुटपणे "अश्वत्थामा मारला गेला तो मनुष्य की हत्ती" असे पुटपुटला.† ते शब्द त्याच्या तोंडून बाहेर पडताच त्याचा रथ जो आतापर्यंत जमिनीपासून चार आंगळे अधांतरी असायचा तो त्याच्या घोड्यांसह जमिनीवर उतरला (म्हणजे खऱ्याची निष्ठेने उपासना करणारा युधिष्ठिर सामान्य जनांच्या कोटीत गेला).

युधिष्ठिराच्या तोंडून 'अश्वत्थामा मारला गेला' हे शब्द ऐकताच द्रोण पुत्रमरणाने विव्हल झाले आणि त्यांनी जगण्याची आशा सोडून दिली. ते पूर्वीप्रमाणे युद्ध करीनासे झाले (द्रोण. १९०) त्यांनी शस्त्रत्याग केला, आपले चित्त योगात लीन करून ते मांडी घालून खाली बसले. ते पाहून धृष्टद्युम्न हाती तलवार घेऊन आला आणि त्याने त्यांचे डोके उडविले. (द्रोण. १९२)

असा हा अजिंक्य द्रोणाचार्यांचा वध कृष्णाने पांडवांच्या यशाच्या इच्छेने कपटाने घडवून आणला. कृष्णाच्या हातून त्या कृत्यात दोन पापे घडली; एक, ज्या सत्यवचनी युधिष्ठिराचा आपल्या नीतीवर पराकाष्ठेचा विश्वास त्याला बदसल्ला दिला, त्याला खोटे बोलायला प्रवृत्त केले; आणि दुसरे पाप म्हणजे, निःशस्त्र होऊन योगावस्थेत गेलेल्या वृद्ध गुरूला ठार मारताना धृष्टद्युम्नाला त्याने आवरले नाही. कृष्ण त्याला आवरू शकत होता, पण असाच त्यांचा वध व्हावा ही कृष्णाची इच्छाच धृष्टद्युम्नाने पूर्ण केली. पाण्डवांच्या जयाविषयीच्या आसक्तीने कृष्णाकडून ही कृत्ये घडली. ती कृष्णकृत्ये (कुकृत्ये) होती यात तिळमात्र शंका नाही. कोणीही नीतिमान मनुष्य या कृत्यांचे समर्थन करू शकणार नाही. अर्जुन, जो त्याचा परमसखा आणि शिष्य, त्यानेही ते अपकृत्यच मानले; कारण अर्जुन हा सरळ मनाचा योद्धा होता. अर्जुनाचे पुढील उद्गार काय सांगतात पाहा : प्रसंग आहे अश्वत्थामा आपल्या पित्याचा कपटाने निःशस्त्र अवस्थेत वध केला गेल्याचे ऐकून खवळून केवळ त्याच्यापाशीच असलेल्या नारायणास्त्राचा प्रयोग करतो असा. त्या अस्त्राच्या प्रयोगाने साऱ्या पृथिवीत उत्पात होऊ लागले. भयंकर अस्त्र पाहून सगळे राजे भयभीत झाले. युधिष्टिराने अर्जुनाला या भीतीचे कारण विचारले तेव्हा तो म्हणाला, "आपल्या पित्याचा अत्यंत लाडका असलेला अश्वत्थामा येत आहे. धृष्टद्युम्नाने माझ्या गुरूंचे केस धरून

† दाक्षिणात्य प्रतीत "अश्वत्थामा मारला गेला असे तो मोठ्याने ओरडला." असे आहे.

त्यांना ओढले ते काय स्वपौरुष जाणणारा त्यांचा पुत्र सहन करील ? धर्मराज, राज्याकरिता तुम्ही गुरूंना खोटचा वाटेला लावलेत. धर्म जाणत असताना तुम्ही महान अधर्म केला आहे. तुमची अपकीर्ती चराचर त्रैलोक्यात कायमची राहील. रामाचा वालिवधाने जसा कायमचा दुर्लौकिक झाला तसा द्रोणांना रणात पाडून तुमचा झाला आहे. 'हा युधिष्ठिर माझा शिष्य सर्व धर्मांनी युक्त, तो कधी खोटे बोलणार नाही' असा त्यांनी तुमच्यावर भरवसा ठेवला, आणि तुम्ही सत्याचा बुरखा घेऊन पुढे असत्यात शिरलात. शाश्वत धर्माचा त्याग करून तुम्ही निःशस्त्र झालेल्या गुरूचा शस्त्राने वध करविलात. आता धृष्टद्युम्नाचे रक्षण त्याच्या अमात्यासह कसे करायचे ते करा. पित्याचा वध केला गेल्याने क्रोधाने ग्रस्त झालेल्या आचार्यपुत्रापासून धृष्टद्युम्नाचे रक्षण आम्ही सगळे एकवटलो तरी करू शकणार नाही. आचार्याविषयींच्या भक्तीने मी 'नको नको' म्हणून ओरडत असताना धर्म टाकून देऊन खुद्द शिष्यानेच गुरूला ठार मारले! जो वात्सल्यभावना ठेवून नित्य पित्यासारखा वागत होता आणि धर्मानेसुद्धा जो पिता होता त्या गुरूचा अल्पकाळच्या राज्याकरिता वध करण्यात आला. माझ्याकडे आणि तुमच्याकडे आशेने पाहणाऱ्या निःशस्त्राला रणात मारण्यात आले. युद्ध करीत असताना इंद्रही ज्यांना मारू शकला नसता त्या सदा साहाय्यकारी वृद्ध आचार्यांचा विश्वासघात आम्ही अनार्यांनी राज्याच्या लोभात बुद्धी ठेवून केला. अरेरे, केवढे हे घोर कर्म झाले, राज्यसुखलोभाने या द्रोणांचा वध केला.* माझे गुरू मारले जात असताना राज्याच्या लोभाने मी तिकडे दुर्लक्ष केले. राजन्, अधोमस्तक होऊन मी नरकगतीला गेलो आहे. ब्राह्मण, त्यात वृद्ध, त्यात पुन्हा निःशस्त्र महामुनी अशा गुरूंचा राज्यलोभाने आम्ही वध करायला लावला. आता जगण्यापेक्षा मेलेले बरे!" (द्रोण. १९६) ...हे निंदेचे उद्गार अप्रत्यक्षपणे गीता सांगणाऱ्या कृष्णालाही लागू नाहीत का?

मधली अनेक युद्धप्रसंगांची वर्णने सोडून देऊन कर्णपर्वातील एका विशिष्ट प्रसंगाचे अवलोकन आपल्याला करायचे आहे. कर्णाशी लढता लढता राजा युधिष्ठिर अतिशय जखमी होऊन आपल्या शिबिराला परतला होता. हे वृत्त कृष्णाने अर्जुनाला तो कर्णाशी भिडण्याच्या प्रयत्नात संशप्तकांशी लढत असताना सांगितले. तेव्हा सचिंत होऊन अर्जुनाने आपला रथ युधिष्ठिराकडे नेण्यास सांगितले. तो जेथे विश्राम घेत पडला होता तेथे कृष्ण व अर्जुन जाऊन पोचले. त्यांना पाहून कर्णाविषयीचा राग मनात असलेल्या युधिष्ठिराला वाटले की हे कर्णाला मारूनच आले आहेत. या कल्पनेने त्याने त्या दोघांचे अभिनंदन चालविले. पण अर्जुन म्हणाला, "कर्णाच्या पन्नास रथींना मारून आणि कर्णाला तसाच सोडून मी तुम्हाला बघण्यासाठी मध्येच इकडे आलो आहे." हे ऐकून युधिष्ठिराला अतिशय राग आला आणि त्याने अर्जुनाचा, त्याच्या बाहुबळाचा, त्याच्या गांडीव धनुष्याचा धिक्कार केला. ते धिक्काराचे शब्द ऐकताच अर्जुनही संतापला. त्याने युधिष्ठिराला ठार मारण्याच्या हेतूने आपले खड्ग हाती घेतले. कृष्णाला त्याचा हेतू समजला आणि त्याने विचारले, "खड्गाने मारावे असे येथे कोणी दिसत नाही. तू युधिष्ठिराला पाहायला आलास ना, मग खड्ग कशाला उचललेस?" अर्जुन म्हणाला, "जो मला गांडीव दुसऱ्याला देऊन टाक असे म्हणेल त्याचे डोके उडविण्याची मनाने पूर्वी प्रतिज्ञा केली आहे. या राजाने तसे शब्द तुझ्या देखत काढले, त्याला मी क्षमा करू शकत नाही. या खड्गाने मी त्याला मारणार आहे."

हे ऐकताच कृष्ण त्याचा धिक्कार करून म्हणाला, "अर्जुना, वडील माणसावर तू क्रोध करीत आहेस त्या अर्थी तू वृद्धांची सेवा केली नसावीस. धर्मज्ञ कोणीही असे कृत्य करणार नाही. करू नये ते करणारा आणि करावे ते न करणारा तो पुरुषाधम होय. तू आपल्या धर्मज्ञानी बंधूचा एखाद्या सामान्याप्रमाणे वध करायला निघालास. जो युद्धाला उभा नाही असा कोणी शत्रू असला तरी त्याचा, युद्धाला पाठमोरा होऊन पळून चाललेल्याचा, शरण आलेल्याचा किंवा बेसावध असलेल्याचा वध करणे सज्जनांनी मान्य केलेले नाही. आणि या वेळी पित्यासमान अशा तुझ्या ज्येष्ठ बंधूची अवस्था अशीच आहे. तू जी पूर्वी प्रतिज्ञा केली म्हणतोस ती अज्ञानाने केली आहेस, म्हणून मूर्खपणाने अधर्माचे हे

---

* अहो बत महत्पापं कृतं कर्म सुदारुणम् । यद्राज्यसुखलोभेन द्रोणोऽयं साधु घातितः ।। (तुलना— गीता १–४५)

कृत्य करायला निघालास. पांडवा, तुला एक धर्मरहस्य सांगतो, ते तुला भीष्म, युधिष्ठिर, विदुर किंवा कुंतीच सांगू शकेल. ते असे की, सत्य बोलावे हे उत्तम, सत्याहून श्रेष्ठ दुसरे काही नाही. परंतु सत्य जसेच्या तसे अमलात कसे आणायचे ते कळणे अत्यंत कठीण आहे. सत्य असले तरी बोलू नये अशी परिस्थिती येऊ शकते. तसेच असत्य बोलले पाहिजे अशी परिस्थिती येऊ शकते. त्याचप्रमाणे जेथे सत्य असत्य होते आणि असत्य सत्य होते अशीही परिस्थिती येऊ शकते. उदाहरणार्थ, विवाहकाली, स्त्रीसंभोगकाली, प्राण जाण्याचे भय उत्पन्न होते तेव्हा, धन लुटले जात असताना, ब्राह्मणाकरिता खोटे बोलण्याचा प्रसंग आला तर ते बोलावे, त्या वेळी ही पाच अनृते पाप ठरत नाहीत. सर्व लुटले जाण्याचा प्रसंग आला असताना खोटे बोलणे अवश्य ठरते. तेथे खोटे हेच सत्य आणि सत्य हे खोटे होते. सत्य हे न बोलण्यासारखे होऊ शकते आणि जे हाती घेतले आहे ते सांगू नये असेही होऊ शकते. सत्य काय, असत्य काय हे निश्चित केल्याने मनुष्य धर्मज्ञानी होतो. आपल्या मनातला संदेह जो वृद्धांना विचारून फेडून घेत नाही तो मोठ्या कात्रीत सापडल्यासारखा होतो. या संबंधात तुला काही लक्षणांनी मी मार्गदर्शन करतो. दुर्लभ असे धर्मज्ञान कोणी तर्काने सिद्ध करतात तर अनेक लोक 'वेद सांगतो तो धर्म' असे मानतात. अशांचा प्रतिवाद करून मी त्यांचा तिरस्कार करीत नाही, पण ते सर्व योग्य आहे असे म्हणता येत नाही. धर्माविषयीचे कथन प्राण्यांच्या भरभराटीकरिता केलेले असते.

यत्स्यादहिंसायुक्तं स धर्म इति निश्चयः ।
अहिंसार्थाय भूतानां धर्मप्रवचनं कृतम् ॥
धारणाद्धर्ममित्याहुर्धर्मो धारयते प्रजाः ।
यत्स्यात् धारणसंयुक्तं स धर्म इति निश्चयः ॥

(जे वागणे अहिंसायुक्त असेल तो धर्म असा नियम आहे. भूतांमध्ये अहिंसा राहावी म्हणून धर्म सांगितला आहे. समाजाची धारणा करतो तो धर्म म्हटला आहे, धर्म हा लोकांना एकत्र ठेवतो. ज्या कोणत्या गोष्टीत समाजाची धारणा करण्याचा गुण आहे ती धर्म असा नियम आहे). अन्यायाने दुसऱ्याला लुबाडण्याच्या इच्छेने जे त्याच्याकडून धर्म पाळण्याची इच्छा करीत असतील त्यांच्यापुढे न बोलता सोडवणूक होत असेल तर तोंडातून ब्रही काढू नये. परंतु बोललेच पाहिजे अशी स्थिती असेल किंवा बोलले नाही तर शंका उत्पन्न होण्याजोगी असेल अशा ठिकाणी खोटे बोलणे हिताचे आहे. तसा अगोदर विचार करून ते असत्य केलेले नसल्यामुळे ते त्या वेळी सत्यच आहे. जो विशिष्ट कार्य साध्य करण्याकरिता व्रत घेऊन मग नाना रीतींनी त्या व्रताचे अर्थ लावू लागतो त्याला त्या व्रताचे फळ लाभत नाही असे विचारवंतांनी म्हटले आहे. पण प्राणसंकट आले असताना, लग्नाच्या संबंधात, सर्व ज्ञातीचा वध होण्याची आपत्ती ओढवली तर, किंवा विनोदात जे असत्य बोलले जाते ते असत्य नव्हे. धर्मतत्त्व जाणणाऱ्यांना यात अधर्म वाटत नाही. चोराशी संबंध आला असता खोटी शपथ घेतल्याने जर सुटका होत असेल तर तेथे खोटे बोलणे हिताचे मानावे, कारण विचार करून ठरविलेले ते असत्य नव्हे. पाप्यांना दिलेल्या धनाने देणाऱ्यालासुद्धा त्रास होतो, म्हणून तो धर्म साधण्याकरिता खोटे बोलला तर तो असत्यभाषी होत नाही. अर्जुना, ही मार्गदर्शक लक्षणे मी तुला शास्त्रोक्त रीतीने सांगितली. ती ऐकल्यानंतर आता युधिष्ठिर वधाला पात्र आहे का सांग."

यावर अर्जुन म्हणाला, "महाबुद्धिमान आणि महाज्ञानी बोलेल तसे तू बोललास. हे तुझे बोलणे आमच्या हिताचेच आहे. मी युधिष्ठिर हा अवध्य आहे असे समजतो. पण मी मनाने जी प्रतिज्ञा केली आहे तिला साजेलसे मी काय करावे ते सांग."

कृष्ण म्हणाला, "युधिष्ठिर कर्णाशी लढून थकून गांजल्यामुळे आणि कर्णाचा वध तुझ्याशिवाय दुसरा कोणी करू शकणार नाही असे त्याला वाटत असल्यामुळे चिडून तो तुला असे बोलला, हे तू लक्षात घे. यावर सौम्य उपाय जो अथर्वांगिरसी श्रुतीने सांगितला आहे तेवढा कर म्हणजे झाले. ती श्रुती सांगते, की मनाला योग्य असलेले पुरुष मान मिळत असेल तोवरच जिवंत मानले जातात. त्यांचा अवमान होऊ लागला, की ते जिवंत असून मेल्यासारखेच समजावेत. या अनुसार तू युधिष्ठिराचा अवमान होईल असे शब्द बोल, त्यांनी तो मेल्यासारखाच होईल. मग त्याचे पाय धर आणि आपण असे का केले ते समजावून देऊन त्यांची क्षमा माग."

हा सर्वच प्रसंग व्यासप्रणीत आहे, की पुराणिकांचा आहे हे ठरविणे कठीण आहे. भाषेच्या शैलीवरून आणि तात्पर्यावरून तो मला तरी व्यासांचा वाटत नाही.





आणि कृष्णाचा धर्मवाद अगदीच अर्थवाद वाटतो. तथापि त्याचे वर्तन मात्र व्यासांनी वर्णिलेल्या घटना-प्रसंगात या धर्मवादाला अनुसरूनच झालेले आपण मागे पाहिले आहे त्यामुळे कृष्ण खरोखरच सत्यधर्माला अशी व्यावहारिक आणि सोयीस्कर मुरड घालण्याच्या मताचा असू शकेल असे वाटते. मागे जो कृष्णाच्या दोन पापकृत्यांचा उल्लेख केला आहे तो याचा पुरावा आहे.

सत्य आणि अहिंसा हा धर्म म्हणजे तिन्हीत्रिकाळी कर्तव्यकर्म आहे, सत्यच बोलावे आणि वर्तावे, तसेच हिंसा टाकून एकमेकांशी वागावे, त्या योगानेच प्रजेची धारणा होते, लोकव्यवहार सत्य-अहिंसेवरच चालू शकतो, जर ते धर्म म्हणून—आवश्यक नियम म्हणून—कायदा म्हणून अमलात आले नाहीत तर समाजात असत्य आणि हिंसा वाढत जाऊन अंदाधुंदी आणि अराजक माजेल, नीती अशी वस्तूच राहणार नाही हे एकदा त्रिकालाबाधित सत्य म्हणून मानल्यानंतर आणि क्षत्रिय राजांचे कर्तव्य सत्य-अहिंसा लोकांत उल्लंघली जाऊ नये हे पाहण्याचे ठरविल्यानंतर त्यांना अपवाद करणे व ते शास्त्रोक्त म्हणून सांगणे हे, मनुष्याची स्खलनशीलता लक्षात घेता, इष्ट आहे काय? हे सोयीचे शास्त्र कृष्णाच्या तोंडी योग्य वाटते काय? कृष्णाने आपली उद्दिष्टे साधण्यासाठी जर या अपवादांचा फायदा घेतला तर दुर्योधनाने, शकुनीने, कर्णाने, अश्वत्थाम्याने तो का घेऊ नये? कृष्णाने पांडवांकरिता 'योग' किंवा युक्ती म्हणजे कपट वापरले तर तो मात्र धर्म, आणि इतरांनी कोणी वापरले तर ते दुष्टकर्म, पापकर्म हा पक्षपात धर्माच्या बाबतीत होऊ शकतो काय? कृष्णाने असे वर्तन केले त्या अर्थी ते योग्य व धर्म्यच आहे असे मानणारे श्रद्धावान आहेत. पण समाजहिताचा विचार करणाऱ्या विचारवंतांनी या प्रश्नाचा विचार केला पाहिजे. गीतेतच 'यद्यदाचरतिश्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः' (श्रेष्ठ मानलेली व्यक्ती जे जे करते ते ते इतरही जन करतात) असे म्हटले आहे आणि कृष्ण श्रेष्ठ म्हणून तर आपण त्याच्या चरिताचा मागोवा घेण्याला प्रवृत्त झालो आहो.

वृद्ध द्रोणगुरूंचा ते युद्धातून निवृत्त होऊन योगस्थित झाले असताना धृष्टद्युम्न त्यांचा वध करताना कृष्णाने त्याला आवरले नाही, आणि आता अर्जुनाला उपदेश करताना, युधिष्ठिराला मारण्याला तो निघाला असता, 'बेसावध असलेल्याचा वध करणे सज्जनांनी मान्य केलेले नाही' असे सांगतो! द्रोणांचा खोटेपणाने वध करण्याला युधिष्ठिर कारणीभूत झाला म्हणून अर्जुनाने त्याची निर्भर्त्सना केली, ती वास्तविक कृष्णाचीच निर्भर्त्सना नव्हे काय? कारण युधिष्ठिराला या खोटयाचा अवलंब करायला लावण्याचा आग्रह त्याला धर्मोपदेश करून कृष्णानेच केला नव्हता काय?

'धर्म' ही गोष्ट अशी कोडयाची करून ठेवली याला व्यास कारणीभूत की कृष्ण? आणि तेच व्यास 'ऊर्ध्व बाहू' करून भारताच्या शेवटी 'ओरडून सांगतो' म्हणतात की,

"धर्माद् अर्थश्च कामश्च स धर्मः किं न सेव्यते"

(धर्मानेच अर्थ आणि काम यांची प्राप्ती होते तो धर्म का आचरला जात नाही?). 'अश्वत्थामा— हत्ती की माणूस' असे वा न वा चे बोलणे व्यासांनी असत्यच मानून आपल्या काव्यमय भाषेत युधिष्ठिराचे सामान्य व्यवहारी लोकांहून नेहमीच चार आंगळे वर असणारे आदर्शस्थान त्यायोगे खाली आले असे स्वतःच सांगितले, त्यावरून आदर्शपालनाच्या बाबतीत माणसांनी किती काटेकोर असले पाहिजे तेच त्यांना सांगायचे नव्हते काय?

असा हा कृष्ण गीतेच्या एका अध्यायात

"अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शान्तिरपैशुनम्"

(अहिंसा, सत्य, क्रोध, त्याग आणि अदुष्टता) ही दैवी संपद् म्हणून सांगतो. पण त्याच्या स्वतःच्या प्रत्यक्ष आचरणात विसंगती दाखविते. हा कृष्णाच्या शीलातला दोष की भारत-महाभारतकारांचा दोष हे कसे ठरविणार? पण दोष कोणाचाही असला तरी तो दोष, हे न्यायाच्या दृष्टीने आपण मानले पाहिजे. द्रोणगुरूंशी केलेल्या या असत्य व्यवहाराबद्दल पुढे स्वर्गारोहण-पर्वात महाभारतकारांनी युधिष्ठिराला काही क्षण का होईना, नरकवास भोगावा लागला असे सांगितले आहे. यावरूनही सत्य आदी धर्माच्या बाबतीत तडजोड चालत नाही असेच त्यांनी दर्शविले आहे. आणि कृष्णाला मात्र येथे तडजोड करायला लावली आहे. ती कवीची कृती की इतिहास-घटना हे कसे ठरविणार? इतिहास-घटना असेच मानण्याकडे कल होतो. आणि तसे मानले म्हणजे 'प्रणयात आणि युद्धात सर्व काही क्षम्य आहे' अशा अर्थाच्या इंग्रजी वचनाशी कृष्णाचा हा धर्मवाद जुळणारा वाटतो.





अर्जुनाने कृष्णाच्या सांगण्याप्रमाणे आपल्या पित्यासमान पूज्य, धर्मनिष्ठ ज्येष्ठ बंधूचा अत्यंत घाणेरड्या शब्दांत अवमान केला आणि या आपल्या धिक्कारणीय कृतीची ग्लानी त्याच्या मनाला आली. त्याने फिरून खड्ग उचलले. तेव्हा कृष्णाने विचारले, "आता खड्ग कशासाठी ?" तेव्हा तो म्हणाला, "ज्या शरीराने करू नये ते केले, ते हे शरीर मी नष्ट करतो." त्यावर कृष्ण म्हणाला, "वीरा, समज, धर्मात्म्या ज्येष्ठ भ्रात्याला तू खड्गाने मारले असतेस तर धर्माच्या भीतीने तुझी कायरे अवस्था झाली असती ? मग तू काय केले असतेस ? पार्था, धर्म सूक्ष्म आहे. तो समजणे फार कठीण आहे– विशेषत: अज्ञ जनांना. तो मी तुला सांगतो ऐक" असे म्हणून कृष्णाने त्या पापावर प्रायश्चित्त म्हणून "स्वत:च्या गुणांची स्तुती युधिष्ठिरापुढे गा, त्या योगे तू मेल्यासारखा होशील" असा उतारा सांगितला. अर्जुनाने तसे केले आणि म्हणाला, "आज मी कर्णाला मारीन किंवा कर्ण मला मारील." त्याने आपली शस्त्रे खाली ठेवली आणि लाजेने खाली मान घालून हात जोडून तो युधिष्ठिराला म्हणाला, "राजन्, मी जे कठोर बोललो त्याची मला क्षमा करा. वेळ आली म्हणजे काय ते आपल्याला कळून येईल. तुमचे प्रिय करण्याकरिताच माझे हे जीवित आहे हे मी सत्य सत्य सांगतो." असे म्हणून त्याने युधिष्ठिराचे पाय धरले आणि तो उठला.

अर्जुनाने जे कठोर शब्द उच्चारले होते ते युधिष्ठिराला लागले होते. तो आपल्या गादीवरून उठला आणि म्हणाला, "मी ज्या रीतीने तुझ्याशी वागलो ते मी वाईट केले. तुम्हा सर्वांना मी आपत्तीत टाकले. म्हणून तू आत्ताच माझे मस्तक तोड. मी अधम, पापी, निर्बुद्ध, आळशी आणि भ्याड मनुष्य आहे, या राज्याला अपात्र आहे. तुझे हे कठोर शब्द सहन करण्यालाही मी अपात्र आहे. तेव्हा आता मला जगावेसे वाटत नाही." असे म्हणून तो "वनात जातो" म्हणून चालू लागला. कृष्णाने त्याला हात जोडले आणि "गांडीवाच्या संबंधात अर्जुनाने मनोमन केलेली प्रतिज्ञा या रीतीने पार पाडण्यास अर्जुनाला मीच सांगितले, 'वडिलांचा अवमान हा त्यांचा वध केल्याप्रमाणेच आहे' असे शास्त्रवचन आहे", असे त्याला समजाविले आणि तो पुढे म्हणाला, "सत्य रक्षणाकरिता माझ्याकडून आणि पार्थाकडून झालेल्या अपराधाची क्षमा कर. आम्ही दोघे तुला शरण आहोत, तुझ्यापुढे मस्तक वाकवून आम्ही भीक मागतो."

आपल्यापुढे डोके वाकविलेल्या कृष्णाला युधिष्ठिराने चटकन वर उठविले आणि हात जोडून तो म्हणाला, "गोविंदा, तू म्हणतोस तेच बरोबर. तुझ्या बोलांनी तू मला जिंकून घेतलेस, मला वाचविलेस. आज तू आम्हाला महान अनर्थातून सोडविलेस." (कर्ण. ७०).

दोघेही भाऊ एकमेकांना मिठी मारून रडले. बराच वेळ रडल्यानंतर त्या दोघांचीही मने स्वच्छ झाली आणि दोघेही पूर्ववत एकमेकांविषयीच्या प्रेमभावनेने भरून गेले. मग युधिष्ठिराने अर्जुनाच्या मस्तकाचे अवघ्राण करून त्याच्या मनाच्या मोठेपणाचे कौतुक केले. अर्जुन म्हणाला, "ज्या कर्णाने बाणांनी तुला इतके जर्जर केले त्याला आज मी रणात मारूनच तुझ्या दर्शनाला येईन, हे माझे वचन सत्य समज." (कर्ण. ७१)

अर्जुन कर्णाशी लढायला निघाला तेव्हा त्याला प्रोत्साहन देणारे आणि त्याच्या पराक्रमाची स्तुती करणारे बोल कृष्ण बोलला. ते बोलताना तो म्हणाला, "द्रोणांना गुरू मानीत असल्यामुळे, अश्वत्थाम्यावर लोभ असल्यामुळे, कृपांना आचार्य मानल्यामुळे, दुर्योधनाच्या बाजूने लढणाऱ्या यादवांविषयी कुंतीमातेचे ते जवळचे नातेवाईक असल्याने वाटणाऱ्या आपलेपणामुळे, यांपैकी कोणालाही मारण्याची तुझी इच्छा नसेल, शल्य हा मामा म्हणून करुणाभावाने त्याला तू मारू इच्छीत नसशील तर त्यांना सोडून दे, पण पांडवांविषयी अत्यंत दुष्टबुद्धी आणि क्षुद्र वृत्ती ठेवणाऱ्या कर्णाला मात्र आज तू धारदार बाणांनी मारच."

कृष्णाच्या या प्रेरक व उत्तेजक वचनांनी अर्जुनाची मरगळ दूर झाली आणि तो उत्साहयुक्त झाला. कर्णाला अर्जुनाच्या रथाने गाठले आणि त्या दोघांचे भयंकर तुंबळ युद्ध झाले. कर्णाला अर्जुनाने जखमांनी भरून टाकले. तेव्हा कर्णाने सर्पमुखी दिव्य बाण सोडला. तो बाण अर्जुनाच्या गळ्याच्या रोखाने येत आहे हे पाहताच कृष्णाने क्षणार्धात घोड्यांना गुडघे टेकायला लावले आणि तो बाण अर्जुनाचा फक्त किरीट उडवून पलीकडे गेला.

कर्णाच्या रथाचे एक चाक जमिनीत रुतले तेव्हा तो खाली उतरून ते वर उचलू लागला. त्या वेळी त्याला मारण्याकरिता अर्जुनाने वेध घेतला तेव्हा कर्ण त्याला

" थांब " असे म्हणून " क्षत्रधर्माच्या विरुद्ध वागू नकोस " असे सांगू लागला. तेव्हा कृष्ण त्याला बोलला, " राधेया, आता तुला धर्म आठवतो काय ? नीच असतात ते आपत्तीत सापडले की दैवाला दोष देतात, आपल्या कर्माला दोष देत नाहीत." असे म्हणून आजवर कर्णाने पांडवांच्या संबंधात दुर्योधनाला जी कुकृत्ये करायला लावली त्या प्रत्येक कृत्याची आठवण देऊन ' त्या वेळी तुझा धर्म कोठे गेला होता ' असे विचारले. त्याला उत्तर न देता कर्णाने लज्जेने मान खाली घातली. तो आपले धनुष्य उचलून उभ्या उभ्याच अर्जुनाशी लढू लागला. तेव्हा कृष्ण अर्जुनाला म्हणाला, ' दिव्य अस्त्राचा प्रयोग करूनच याला रणात पाड." (कर्ण.९१)

कर्ण रणात पडला. त्यानंतर शल्य सेनापती झाला. कृष्णाने त्याच्याशी लढण्याकरिता युधिष्ठिराला प्रोत्साहित केले.

सर्व कौरवबंधू मारले गेले. फक्त दुर्योधन उरला. तो एका तलावात जाऊन लपून बसला. पांडवांना व्याधाकडून ते कळले. कृष्णासह ते सगळे त्या तलावाकडे गेले. युधिष्ठिर म्हणाला, " कृष्णा, हा आपल्या मायेचा उपयोग करून लपून बसला आहे. पण याला मी मारल्याशिवाय सोडणार नाही." कृष्ण म्हणाला, " या कपटी दुर्योधनाला आणि त्याच्या कपटाला तू कपटानेच जिंक. मायावीला मायेनेच मारावे असे शास्त्रवचन आहे. काही युक्ती पाण्यात योजून, नाना प्रकारे इतर प्रयत्न आणि उपाय योजून या मायावी दुर्योधनाला तू ठार कर." मग युधिष्ठिराने दुर्योधनाच्या वीरवृत्तीला चाळविले आणि त्याला " युद्धाकरिता बाहेर ये, भ्याडासारखा लपून काय बसलास " असे मर्माघाती बोलून पाण्यातून बाहेर यायला लावले.

दुर्योधन बाहेर पडून पांडवांपैकी प्रत्येकाशी पाळीपाळीने लढायला तयार झाला. सर्वांनी मिळून त्याला मारावे असा कृष्णाचा बेत असावा, पण युधिष्ठिराने तो अधर्म मानून " तू आमच्यापैकी कोणाशीही गदेने लढ, लढताना आमच्यापैकी कोणी हरला तरी राज्य तुझे होईल " असे त्याला सांगितले. हे ऐकताच कृष्ण भडकला आणि त्याने युधिष्ठिराची खूप निर्भर्त्सना करून म्हटले, " पुन्हा तू जुगार खेळायला लागलास, दुर्योधनाला गदायुद्धात सरळपणे जिंकणे तुमच्यापैकी कोणालाही शक्य होणार नाही, आतापर्यंत मिळविलेला विजय तू मातीत घालीत आहेस ". पुढे भीमाने दुर्योधनाशी गदायुद्ध करावे असे ठरले. ते युद्ध चालत असता दुर्योधनाची आणि भीमाची सारखी बरोबरी होऊ लागली. भीम हा शक्तीने दुर्योधनापेक्षा अधिक होता, पण दुर्योधनाने सतत अभ्यासाने गदायुद्धात भीमापेक्षा अधिक प्रवीणता मिळविली होती. म्हणून तो आटपेना तेव्हा कृष्णाने भीमाला त्याच्या जांघेवर प्रहार करून त्याला मारायला सुचविले. वास्तविक हे कृत्य गदायुद्धाच्या नियमाच्या विरुद्ध होते. दुर्योधनाचा गदायुद्धाचा गुरू बलराम या वेळी तेथे हजर होता. त्याला ते रुचले नाही. भीमाचा धिक्कार करून तो तावातावाने द्वारकेला निघून गेला. पण कृष्ण त्याला म्हणाला की, " हा नियमभंग जर केला नसता तर दुर्योधन मारलाच गेला नसता, तो अजिंक्यच राहिला असता. म्हणून हे करण्यास सांगावे लागले. "

दुर्योधन मरणोन्मुख होऊन पडला असता भीमाने क्रोधाच्या आवेगात त्याच्या डोक्याला लाथ मारली व त्याचा किरीट उडविला. हे क्षत्रियवीराला न शोभणारे कृत्य केल्याबद्दल जमलेल्या राजांना व वृद्धांना भीमाचा तिटकारा वाटला. युधिष्ठिराने भीमाला " असे करणे आपल्याला शोभत नाही " इत्यादी सांगितले. पण इतर पांडव व पांचाल भीमाची प्रशंसा करू लागले तेव्हा त्यांना कृष्ण म्हणाला, " मारलेल्या शत्रूला पुन्हा मारणे न्याय्य नाही. हा बुद्धिहीन दुर्योधन तेव्हाच मेला जेव्हा हा राज्यलोभी होऊन आणि पाप्यांच्या नादी लागून निर्लज्ज झाला. याला कठोर शब्दांनी बोलून पुन्हा का मारता ? आता हा नीच पुरुष कोणाचाही मित्र किंवा शत्रू होण्याच्या पात्रतेचा राहिलेला नाही. तेव्हा, चला, आपण आता आपापल्या रथात बसून येथून निघून जाऊ या. "

कृष्णाचे हे बोलणे ऐकून मरणोन्मुख होऊन पडलेला दुर्योधन संतापाने तट्कन उठून, खाली हात टेकून आणि आपल्या कुल्ल्यावर बसून कृष्णाकडे जळत्या डोळ्यांनी पाहू लागला. आपल्याला होणाऱ्या प्राणान्तकारी वेदनांना न जुमानता तो त्याला म्हणाला, " अरे कंसाच्या चाकराच्या पोरा, अधर्माने मला युद्धात पाडलेस, त्याची तुला लाज नाही वाटत ? माझी मांडी फोडायला भीमाला तू खोटेपणाने सुचविलेस, अर्जुनाकरवी तू ते त्याला सांगितलेस ते मला समजले नाही असे तू समजतोस ? या युद्धात तू खोटेपणाच्या







कपटाच्या उपायांनी माझ्याकडच्या पितामह भीष्म, द्रोण, कर्ण अशा महावीरांना मारायला लावलेस याची तुला काही लाजलज्जा ? प्रत्येक वेळी तू जर कपटाचा प्रयोग करायला लावला नसतास तर तुम्ही काय आम्हाला जिंकू शकत होता ?"

यावर कृष्णाने त्याला उलट उत्तर देऊन तो आजवर पांडवांशी दुष्टपणाने आणि कपटाने कसा वागला त्याचा पाढा वाचला आणि तो म्हणाला, "जी अनुचित कृत्ये आम्ही केली असे तू म्हणतोस ती तुझ्याच महान् दोषाने केली गेली आहेत. करू नये अशी कृत्ये तू केलीस. आता त्याची फळे भोग."

दुर्योधन म्हणाला, "अरे, मी तर सम्राटपदाचा आणि राज्याचा उपभोग घेऊन चुकलो आहे, आता खऱ्या क्षत्रियाला साजेल अशा रीतीने मृत्यू वरला आहे आणि स्वर्गात माझे स्थान राखलेले आहे. तुम्ही मात्र सगळे आप्त, सुहृद् गमावून बसला आहात, आता खुशाल रडत राज्य चालवा."

दुर्योधनाच्या या उद्गारांची आजूबाजूच्या लोकांनी प्रशंसा केली. ते पाहून कृष्ण आणि पांडव लज्जित झाले. युधिष्ठिर तर महाविषादाने भरून गेला. तेव्हा कृष्णाने त्याची समजूत घातली आणि "कपट योजले नसते आणि सरळपणे आपण लढलो असतो तर तुला विजय, राज्य आणि धन कसे मिळाले असते" असे तो म्हणाला. (शल्य. ६१)

पांडव युद्ध संपवून हास्तिनपुरात प्रवेश करायला निघाले. तेथे गेल्यावर धृतराष्ट्र–गांधारी यांना भेटावे लागणार त्या वेळी ती दोघे कशी वागतील ? गांधारी तर आपले डोळे उघडून आपल्याला जाळून भस्म करील, या आपत्तीतून आपणाला वाचवायला एक कृष्णच समर्थ आहे असा विचार करून युधिष्ठिराने आपल्या प्रवेशाच्या अगोदर कृष्णाला तिकडे जायला सांगितले आणि कृष्णही ते कार्य पत्करून गेला.

कृष्ण आल्याचे धृतराष्ट्राला सांगितले गेले. आपल्या रथातून उतरून कृष्ण हा मनात लाचारी न ठेवता ('अदीनात्मा') धृतराष्ट्राकडे गेला. त्याने त्या दोघा वृद्धांचे पाय धरले. गांधारीला त्याने मनाची मुळीच चलबिचल न होऊ देता प्रणाम केला. धृतराष्ट्राचा हात हाती घेऊन कृष्ण मोठ्याने रडू लागला ('सुस्वरम्') थोडा वेळ रडल्यानंतर त्याने आपले डोळे वगैरे पाण्याने धुतले आणि धृतराष्ट्राशी प्रस्तुत विषयासंबंधी बोलताना मागील घटनांचा–विशेषतः पांडवांनी कुलक्षय होऊ नये याकरिता जे अनेक प्रयत्न केले त्यांचा–उल्लेख केला आणि तो म्हणाला, "तुम्ही ज्ञानी आहात, या कुलक्षयाचा दोष पांडवांना लावू नका, त्या महात्म्यांनी यत्किंचितही धर्माची, न्यायाची, आणि स्नेहाची मर्यादा ओलांडली नाही. हे सारे तुमच्या दोषांचे फळ आहे. हे तुम्ही जाणावे. तुम्ही पांडवांकडे कल्याणमय दृष्टीने पाहावे. तुमच्यावर धर्मराजाची किती भक्ती आहे हे तुम्ही जाणता. अपकारी शत्रूंचे कंदन केल्यानंतर तो आता रात्रंदिवस मनात जळत आहे, त्याला स्वस्थता नाही. तुमच्याविषयी आणि गांधारीविषयी त्याला अतिशय शोक वाटून तो बेचैन आहे. अतिशय लज्जा वाटून तो तुमच्या भेटीला येत नाही."

आणि मग गांधारीकडे वळून तो म्हणाला, "गांधारी, मी काय म्हणतो ते ऐकून घे. आज या जगात तुझ्यासारखी स्त्री नाही. राणी, राजसभेत माझ्या समक्ष तू दोन्ही पक्षांना हितवचन बोलली होतीस. पण तुझ्या मुलांनी ते ऐकले नाही. तू दुर्योधनाला म्हणाली होतीस, 'निर्बुद्ध मुला, ऐक, जेथे धर्म तेथे जय असतो' तेच तुझे शब्द खरे झाले आहेत. हे लक्षात घेऊन तू शोक करू नकोस, आणि, पांडवांचा नाश व्हावा अशी बुद्धी मनात धरू नकोस."

गांधारी म्हणाली, "कृष्णा, दुःखाने जळत राहिल्यामुळे माझी मती चलित झाली होती, पण तुझ्या या बोलण्याने ती ठिकाणावर आली आहे. आता पुत्र मारले गेल्यानंतर अंध आणि वृद्ध राजाचा पांडवांसह तूच एक आधार आहेस." असे म्हणून डोळ्यांना पदर लावून ती रडू लागली. तिचे व धृतराष्ट्राचे सांत्वन करीत असतानाच कृष्णाला एकदम अश्वत्थाम्याच्या संकल्पाची आठवण झाली आणि तो चटकन उठला. त्याने त्या सर्वांना नमस्कार केला आणि तो पांडवांकडे गेला (शल्य. ६३).

दुर्योधनाने मरताना अश्वत्थाम्याला आपला सेनापती म्हणून शेवटचा अभिषेक केला होता आणि त्या वेळी अश्वत्थाम्याने प्रतिज्ञा केली होती की, मी पांडवांचा कुळासह वध करीन. हे कर्म पतंगाने आगीत उडी घेण्यासारखे आहे हे त्याला माहीत होते. म्हणून त्याने गुप्तपणे पांडवांच्या शिबिरात, ते तेथे नसताना, जाऊन धृष्टद्युम्न वगैरे सर्व पांचाल, द्रौपदीचे पुत्र असे झोपले असताना त्या सर्वांना कापून काढले. पांडवांचा



अनुक्रमणिका

वंश एकच एक उत्तरेच्या गर्भात वाढत होता. त्याच्यावरही त्याने आपले अस्त्र सोडले. पण कृष्णाला या गोष्टीची आठवण होऊन तो तिकडे धावत गेला आणि आपल्या सुदर्शन चक्राने त्याने त्या गर्भाचे रक्षण केले.

पांडव हास्तिनपुरात गेले आणि एकएकजण पुढे होऊन धृतराष्ट्र-गांधारींना प्रणाम करू लागला. भीमसेनाला भेटण्याकरिता धृतराष्ट्राने आपले बाहू पसरले. पण त्याचा तो आविर्भाव पाहून कृष्णाने भीमाचा लोखंडाचा पुतळा त्याच्यापुढे सारला. हा पुतळा दुर्योधन गदेने लढण्याचा अभ्यास करण्याकरिता नित्य वापरीत असे. धृतराष्ट्राने आतल्या उफाळणाऱ्या क्रोधाने तो पुतळा छातीशी इतक्या जोराने दाबला की त्याचे दोन तुकडे झाले. धृतराष्ट्र रक्त ओकू लागला आणि जमिनीवर पडला. क्रोधावेश उतरल्यावर भीम मेला असे समजून तो "भीमा, अरे भीमा" असा आक्रंद करू लागला. तेव्हा कृष्णाने पुढे होऊन त्याला काय घडले ते सांगितले आणि भीमाचा घात करण्याचा प्रयत्न केल्याबद्दल त्याला ठपका देऊन तो म्हणाला, "पूर्वी तुम्हाला सर्व वडील मंडळींनी आणि सुहृदांनी समजावले असतानासुद्धा तुम्ही त्यांचे न ऐकता दुर्योधनास आवरले नाहीत आणि आता पांडवांवर क्रोध करता ? आपली बुद्धी स्थिर ठेवून जो स्वतःच दोषांची व परिस्थितीची जाणीव राखतो तो श्रेष्ठ श्रेय संपादन करतो. याच्या उलट वागून जो अन्यायाचा आसरा घेतो त्याला शोक करण्याची पाळी येते." (स्त्री. १२ व १३)

रणात पडलेल्या आपल्याकडच्या वीरांना पाहण्यासाठी गांधारी व कौरवस्त्रिया गेल्या असता ती सर्व प्रेते पाहून गांधारी अतिशय शोक करू लागली आणि रागाने कृष्णाला म्हणाली, "कृष्णा, हे पांडव आणि हे कौरव एकमेकांना जाळून मेले, पण त्यांचा नाश होत आहे हे पाहूनही तू तिकडे दुर्लक्ष कसे केलेस ? तुझे सामर्थ्य एवढे मोठे होते की, तू दोघांनाही आवरू शकला असतास. ते तू केले नाहीस. त्याचे फळ आता भोग. पतीच्या शुश्रूषेने जे काय तपोबळ मला लाभले असेल त्या बळाने मी तुला शाप देते. ज्या अर्थी कुरु-पांडव परस्परांची कुळे मारीत असता तू त्याकडे दुर्लक्ष केलेस त्या अर्थी तूदेखील तुझ्या कुळाचा संहार करशील. या भरतवंशाच्या स्त्रिया ज्याप्रमाणे आपल्या मृत पति-पुत्र-बांधवांच्या अंगांवर पडून विलाप करीत आहेत तशाच तुझ्याकडील स्त्रियाही आणखी छत्तीस वर्षांनी आपापल्या पति-पुत्र-बांधवांच्या प्रेतांवर पडून विलाप करतील."

तिचे हे महाभयंकर शब्द ऐकून कृष्णाने किंचित स्मित केले आणि तो तिला म्हणाला, "क्षत्राणी, हे पुढे असे घडणार हे मला माहीत आहे. कृष्णीयादव नियतीमुळेच असे नष्ट होणार आहेत. त्या कुळाचा संहार करणारा माझ्यावाचून अन्य कोणी नाही. इतरांकडून ते मारले जाणे शक्य नाही." कृष्णाचे हे शब्द ऐकून पांडवांची मने त्रस्त झाली. त्यांना अतिशय उद्वेग उत्पन्न होऊन जीवनाविषयीचा त्यांचा उत्साहच मावळल्यासारखा झाला (स्त्री. २५).

हा भाग क्षेपक असावा असे मला वाटते. पण येथे वास्तविक कृष्णाच्या कर्तृत्वाचा काळ संपला. 'स्त्रीपर्वा' नंतर 'शांतिपर्व' येते. त्यात युधिष्ठिराला ज्ञातिवधाचा पराकाष्ठेचा झालेला शोक आणि विरक्ती घालविण्याकरिता कृष्ण त्याला इतर पांडवांसह शरपंजरी पडलेल्या भीष्मांकडे घेऊन जातो. हे संबंध 'शांतिपर्व' युधिष्ठिराचे निरनिराळे धार्मिक, आध्यात्मिक, राजनैतिक इत्यादी प्रश्न व त्यांना भीष्मांनी दिलेली उत्तरे यांनी भरलेले आहे. पुढे 'अनुशासनपर्व' येते. त्यातही कृष्णाविषयी विशेष काही नाही. भीष्म कृष्णाची अनुज्ञा घेऊन आपले प्राण सोडतात. 'आश्वमेधिक पर्वा'त कृष्ण युधिष्ठिराला पुन्हा त्याचा शोक व्यर्थ कसा आहे हे तत्त्वज्ञान सांगून समजावून सांगतो. त्यात तो सांगतो, "आतापर्यंत भीष्म-द्रोणादिकांशी तू लढलास, आता स्वतःच्या मनाशी तुला लढायचे आहे. या युद्धाच्या तयारीला लागून आपल्या कर्मांनी मुक्त होऊन श्रेष्ठ अशा अव्यक्ताच्या पलीकडे तुला जायचे आहे. आता त्याकरिता स्वतःशीच तुला लढायचे आहे. ते करताना या राज्याचे यथायोग्य रीतीने तू शासन कर." (अनु. १२) पुढे तो युधिष्ठिरादिकांची अनुज्ञा घेऊन द्वारकेस जातो (अनु. १५). यापुढे पुन्हा अर्जुनाच्या तोंडी काही प्रश्न घालून महाभारतकारांनी कृष्णाकडून तत्त्वज्ञान वदविले आहे. त्यात कर्मविवरण, मोक्षप्राप्ती, समाधियोगशास्त्र इ. विषय आले आहेत. असाच तत्त्वज्ञानात्मक भाग पुढे युधिष्ठिराच्या प्रश्नासंबंधात कृष्णाच्या तोंडी घातला आहे. त्यात कृष्ण हा परमात्मास्वरूप मानून त्याच्या भक्तीचा म्हणजे वैष्णव धर्माचा उपदेश केलेला आहे.

'मौसलपर्वा'त यादवांत परस्परांत क्षुल्लक कारणावरून अभिमानाला पेटून मारामाऱ्या होतात, ज्याला 'यादवी' असे पुढे नाव पडले आहे. या यादवीत सारे यादवकुळ कसे नष्ट झाले, बलराम योगसमाधी लावून कसा गेला आणि कृष्णाने या यादवीत भाग घेऊन आपले पुत्र, पौत्र, बांधव इ. ज्यांनी मारले त्यांची स्वतः कशी कत्तल केली आणि हे सर्व केल्यानंतर तो जंगलात एकटाच भटकत राहिला आणि पुढे एके ठिकाणी तो ध्यानमग्न बसला असताना 'जरा' नावाच्या व्याधाचा बाण लागून तो कसा मरण पावला याचे वर्णन आले आहे ( मौसल. ४ ).

खरे कृष्णाचे कर्तृत्व कौरव-पांडव युद्ध संपल्यानंतर संपते. म्हणून या पुढच्या भागाचा विचार 'कृष्णचरिता' च्या दृष्टीने मला विचारात घेण्यासारखा वाटत नाही.

पुढे अर्जुनाच्या कर्तृत्वाला–पराक्रमाला–क्षीणता आल्याचे महाभारतात वर्णन आहे. अर्जुनाची क्षीण पराक्रमशक्ती आणि कृष्णाचे असे अज्ञात मरण या संबंधात व्यास अर्जुनाला जे सांगतात ते लक्षात ठेवण्यासारखे आहे. व्यासांचे शब्द आहेत :

"एवं बुद्धिश्च तेजश्च प्रतिपत्तिश्च भारत।
भवन्ति भवकालेषु विपद्यन्ते विपर्यये।
कालमूलमिदं सर्वं जगद्बीजं धनंजय।।
काल एव समादत्ते पुनरेव यदृच्छया।
स एव बलवान् भूत्वा पुनर्भवति दुर्बलः।।
स एवेशश्च भूत्वेह परैराज्ञाप्यते पुनः।

(मौसल. ८.३३–३५)

(अशा रीतीने बुद्धी, तेज आणि मानमान्यता ही चढतीच्या काळात टिकतात, तो काळ उलटला की ती नष्ट होतात. या सर्व जगरहाटीचे बीज, अर्जुना, काळ हे आहे. तो दैवाच्या इच्छेने पुन्हा त्यांचा ताबा घेतो. बलवान तोच होतो आणि फिरून तोच दुर्बल होतो. तोच अगोदर सत्ता गाजवितो आणि मग तोच फिरून दुसऱ्यांच्या सत्तेखाली जातो.)

इतिहास हे सतत दाखवीत आला आहे. अलेक्झांडर, नेपोलियन आणि अगदी अलीकडच्या काळातील म. गांधी, विनोबा, जयप्रकाश नारायण अशा विभूतींच्या बाबतीत हीच स्थिती झालेली दिसून येते.

## कृष्णचरितचिकित्सा

'साक्षात योगेश्वराच्या मुखातून बाहेर पडलेला बोध' असे गीतेचे माहात्म्य मानले जात असल्यामुळे 'योगेश्वर' कृष्णाच्या चरिताचा मागोवा घेण्याची जिज्ञासा जागणे स्वाभाविक आहे. त्याच जिज्ञासेने मी महाभारतात जेथे जेथे ज्या ज्या प्रसंगाच्या निमित्ताने कृष्णाची वागणूक आणि वचन मिळाले ते ते प्रयत्नपूर्वक संशोधिले आणि जे मला आढळले त्यातून काहीही न वगळता, महत्त्वाचे काही न सोडता, मागील 'कृष्णचरिता' च्या पाच प्रकरणांत मांडण्याचा प्रयत्न केला आहे. त्या चरितातून महाभारतातील कृष्ण आपल्यापुढे उभा राहातो. रामाची ओळख पहिल्याप्रथम जगाला करून देणारा पहिला ग्रंथ जसा वाल्मीकींचे रामायण, तसा कृष्णाची जगाला पहिल्याप्रथम ओळख करून देणारा पहिला अधिकृत ग्रंथ व्यासांचे महाभारत हा आहे यात शंका नाही. 'हरिवंश' आणि 'भागवत' हे ग्रंथ पुष्कळ मागाहूनचे आहेत असे विद्वान संशोधकांचे मत आहे आणि ते बरोबर आहे. वासुदेव कृष्णाला परमेश्वराचा अवतार मानण्यात येऊ लागले त्या काळात झालेले हे ग्रंथ आहेत. नारायणीय धर्म, वासुदेव उपासना किंवा भागवतधर्म यांच्या गरजेतून निर्माण झालेले हे ग्रंथ आहेत. त्यामुळे मनुष्य कृष्ण म्हणून त्याच्या चरिताचा अभ्यास त्यांवरून होऊ शकत नाही. ईश्वरी अवताराच्या चरिताची चिकित्सा कोण कशी करणार? आणि त्या चिकित्सेचा उपयोग तरी काय? भागवतातच शुकांनी परिक्षित राजाला स्पष्ट सांगितले आहे की, "न देवचरितं चरेत्." ईश्वरावतार हे केवळ उपासनेला–भक्तीला आधार असतात.

म्हणून भारतामधला कृष्ण हाच एक अभ्यासाचा विषय होऊ शकतो असे मी मानतो. भारतातही मधून मधून कित्येक अध्यायच्या अध्याय आणि श्लोक कृष्णाला देवावतार दाखविणारे आहेत, पण ते सौतीसारख्या भागवत वा वैष्णवधर्मीय पुराणिकांनी रचलेले आणि मधून मधून पेरलेले आहेत हे शोधबुद्धीला उघड दिसून येण्यासारखे आहे. तशी वर्णने आणि वचने मी 'कृष्णचरित' मांडताना सोडून दिली आहेत आणि त्यामुळे कृष्णचरित समजण्याला काही अडचण येते असे मला आढळले नाही. उलट, ती वर्णने सोडल्याने मनुष्य कृष्ण अधिक चांगल्या रीतीने समजतो असे मला वाटते.

भारतामधला व्यास महाकवींचा कृष्ण हा स्वभावतः अन्यायाविरुद्ध असणारा, उपजतच नेतृत्वाचे गुण असणारा आणि त्या नेतृत्वाचा वापर अन्याय व जुलूम नष्ट करण्याकडे करणारा, क्षत्रियवृत्तीचा कट्टा उपासक, सर्व क्षात्रविद्या-कलांचा उत्तम जाणकार (ज्यात शस्त्रास्त्रविद्येपासून घोड्याचा खरारा इ. करण्यापर्यंतचे सर्व व्यवसाय येतात), नयशास्त्र पारंगत म्हणजे राजकीय मुत्सद्दी, समतोल विचार राखणारा व राखायला लावणारा विवेकी बुद्धिमान, व्यवहारशास्त्र उत्तम जाणणारा व ते योग्य तेथे बरोबर अमलात आणणारा, मैत्रीच्या बाबतीत निष्ठावंत, कुटुंबवत्सल, गुरुजनांविषयी पूज्यभाव बाळगणारा, प्रसंगी अवश्य तितका कठोरपणा धारण करून योग्य वाटते ते करणारा, असा आपल्या हृदयात ठसतो. प्रजांना जुलमी सत्ताधाऱ्याच्या ताबडीतून सोडविण्याचे यशस्वी प्रयत्न त्याने, स्वतःचा जीव धोक्यात घालूनसुद्धा, केल्याने आणि सत्ता मिळविण्याचे सामर्थ्य असतानादेखील स्वतः कधीही सत्ताधारी न झाल्याने तो सर्वांना सर्वत्र अतिशय प्रिय आणि आदरणीय झाल्याचे आढळते. त्याच्या हयातीतच एक महान विभूती म्हणून त्याचा सगळीकडे लौकिक पसरलेला असल्याचे भारतातील अनेक वर्णनांवरून कळून येते.

किशोरवयात असताना ज्या गोपसमाजात तो राहात होता त्या समाजावर कंसराजाकडून होत असलेल्या जुलमांचे व अन्यायांचे दर्शन त्याच्या कुशाग्र बुद्धीला झाले होते आणि गोपप्रजा कंसाविरुद्ध प्रक्षुब्ध असल्याचे त्याला आढळले होते. त्यांना खंबीर आणि कणखर नेतृत्वाची गरज आहे हे त्या वयातही त्याच्या लक्षात येऊन त्याने बलरामाच्या मदतीने त्या गोपसमाजाची संघटना केली, त्यांचे एक सैन्य बनविले आणि मग कंसाला आह्वान देऊन त्याच्या सैन्याशी सामना करण्याचे साहस अंगावर घेऊन त्याने लढाई केली आणि कंसाला ठार करून त्याचा पिता, जो पूर्वीचा राजा उग्रसेन त्याला राज्यावर बसविले. आपला पिता वसुदेव याला त्याने त्याचा मुख्य अमात्य केले. उग्रसेनाच्या अमलाखाली त्याने सर्व यादवकुळांना एकत्र करण्याचा प्रयत्न केला; पण सर्वच यादव त्याला वश झाले नाहीत. चेदिराजासारखे काही फुटून राहिले.

पुढे जरासंध या अत्यंत महत्त्वाकांक्षी मगध-सम्राटाशी भिडण्याचा या यादवांवर प्रसंग आला. कंस हा जरासंधाचा जावई. त्याला ज्याने मारले आणि राज्यभ्रष्ट केले त्या कृष्णाला आपल्या ताब्यात घेण्यासाठी जरासंधाने सतरा वेळा मथुरेवर स्वाऱ्या केल्या आणि तितक्या वेळा कृष्ण-बलरामांच्या नेतृत्वाखाली यादवांनी त्याला परतवून लावले. पण पुढे दुसरा एक परकीय बलाढ्य राजा जरासंधाचा मित्र झाला. तो त्याच्या मदतीला आल्यामुळे या दुप्पट झालेल्या सैन्याशी सामना देणे यादवांना अशक्य आहे हे जाणून, केवळ आपल्याकरिता यादवांना जरासंधाचा त्रास सोसावा लागू नये म्हणून, कृष्ण-बलराम आणि त्यांचे अनुयायी यादव यांनी मथुरा सोडण्याचे ठरविले व आपल्या आसऱ्यासाठी दूरच्या अशा पश्चिमेकडील प्रभासतीर्थाजवळ रैवतक पर्वताच्या आश्रयाने असलेल्या कुशस्थलीकडे त्यांनी प्रयाण केले. तिकडेच त्यांनी समुद्रकाठी अजिंक्य अना दुर्ग बांधून नवीन द्वारका नगरी वसविली. त्यामुळे मथुरा जरासंधाला मोकळी मिळाली. त्याने मथुरेचा ताबा घेऊन उग्रसेन कृष्णाबरोबर पळून गेला असल्यामुळे कंसाच्या मुलाला राज्यावर बसविले आणि तो प्रदेश आपल्या साम्राज्याला जोडला. पण यादवांची ही मानहानी व स्वातंत्र्याचा अपहार कृष्ण कधीच विसरला नाही. पुढे अनेक वर्षांनंतर त्याने पांडवांची मदत घेऊन जरासंधाच्या विक्रमी सैन्याशी मुकाबला करून मोठ्या युद्धाचा प्रसंग न आणता जरासंधाला मारण्याची युक्ती योजली आणि वेष पालटून जरासंधापर्यंत प्रवेश मिळवून त्याला एकट्याला द्वंद्वयुद्धाला चेतविले आणि भीमाकरवी त्याला मारविले. मग जरासंधाने कैदेत डांबून ठेवलेल्या अनेक राजांना त्याने मोकळे केले आणि त्यांचे त्यांचे प्रदेश त्यांना देऊन पांडवांच्या आधिपत्याखाली त्यांना जोडले. या प्रदेशांत मथुराही आली. हे घडवून आणण्यात कृष्णाला आपल्या बुद्धिचातुर्याचा उपयोग करावा लागला खरा, पण त्याहूनही फार मोठे साहस अंगावर घ्यावे लागले, भीम-अर्जुनासारख्या पांडवश्रेष्ठांचे प्राण युधिष्ठिराकडून उसने म्हणून घेऊन त्यांना या मोहिमेत वापरावे लागले. आपण या साहसात यशस्वी होऊ इतका प्रचंड आत्मविश्वास कृष्णात होता, तरी प्राण गमवावे लागले तरी गमावण्याची तयारी होती, इतके महत्त्व जरासंधाचे साम्राज्य मोडून काढण्याला तो देत होता, हे यावरून दिसून येते.




कृष्णाची कौरवसभेतील शिष्टाई ही त्याच्या उत्कृष्ट राजनीतिज्ञतेची साक्ष पटविणारी घटना आहे यात शंका नाही. यात त्याची दूरदर्शिता आणि चातुर्यही प्रकट झालेले आहे. शिष्टाईचे हे अध्याय वाचीत असताना मला एकसारखी गांधीजींच्या १९३१ सालच्या लंडन येथील गोलमेज परिषदेतील कार्याची व त्या वेळच्या लंडनमधील त्यांच्या अवांतर कार्याची आठवण होत होती आणि दोहोंमध्ये विलक्षण साम्य प्रतीत होत होते. अन्याय झालेल्यांची न्याय्य बाजू राजसभेत मुद्देसूद रीतीने मांडण्याचे कार्य शांतपणे आणि सडेतोडपणे करीत असतानाच कौरव पक्षाला सामील झालेल्या इतर राजांची सदसद्विवेकबुद्धी जागृत करण्याचेही कार्य तो करीत होता, आणि लोकसमाजाला कौरवांकडून झालेला अन्याय आणि पांडवांची न्याय्य बाजू पटविण्याचाही प्रयत्न करून तो पांडवांची बाजू लोकमानसात बळकट करीत होता. राजसभेपुढे करावयाच्या वकिलीइतकेच लोकमानसात अनुकूलता निर्माण करणे तो महत्त्वाचे मानीत होता ही लक्षात घेण्याजोगी गोष्ट आहे. या सर्व प्रकरणी त्याने राजनीतीतील साम, दान, भेद हे सर्व शास्त्रमान्य प्रकार वापरले, कर्णाला दुर्योधनापासून फोडण्याचा प्रयत्न केला आणि कशातही यश न मिळाल्याचे पाहून त्याने शेवटी दंडाचा निर्णय घेतला आणि तो पांडवांच्या गळी उतरविला. त्या वेळची कृष्ण-कर्णाची भेट आणि परस्परसंवाद हा महाभारतातील एक अत्यंत रोमहर्षक आणि उदात्त प्रसंग आहे आणि व्यासांनी अत्यंत समर्थपणे तो उभा केला आहे. आता लढाई चुकत नाही हे भविष्य मनात निश्चित करून एकमेकांचा निरोप घेताना कर्ण आणि कृष्ण एकमेकांना जिव्हाळ्याने कडकडून भेटतात असे ते दृश्य आहे. या प्रसंगाने कृष्णाची निर्वैर वृत्ती लक्षात भरते.

नित्यजीवनात सत्य-अहिंसा धर्माचे महत्त्व मानीत असूनही राजकारण आणि युद्धप्रसंगी कपटप्रयोग करणे कृष्ण निषिद्ध मानीत नव्हता. कृष्ण हा नीतिनिष्ट थोर पुरुष अशी त्याची ख्याती होती. भीष्मांसारख्यांनी त्याला अग्रपूजेचा मानकरी ठरविले ते काही त्याच्या युद्धकौशल्यामुळे किंवा बुद्धिमत्तेमुळे नव्हे, तर त्याच्या नीतिपरायणतेमुळे. या ख्यातीच्या पार्श्वभूमीवर त्याने वापरलेले कपटप्रयोग त्याच्या शीलाला न शोभण्यासारखे वाटतात, मनाला खटकतात आणि हे प्रयोग थोडेथोडके नाहीत. प्रत्येक नडीच्या प्रसंगी त्याने त्यांचा अवलंब केल्याचे आढळून येते आणि व्यासांनी दुर्योधनाच्या तोंडी मरणकाली कृष्णाविषयीच्या त्याच्या निंदाउल्लेखांत ते घातले आहेत. कपट, युक्त्याप्रयुक्त्या याला संस्कृतात 'योग' हा शब्द आहे आणि या 'योगा'त कृष्ण पटाईत होता असे व्यासांच्या वर्णनातून तरी दिसून येते. एकदा ज्याची बाजू घेतली त्याचा जय कसा होईल हेच तो पाहात होता आणि त्या कामी सूक्तासूक्त, विधिनिषेध तो बाळगीत नव्हता. इतकेच नव्हे तर आपल्या अशा कृतींना तो शास्त्रवचनांचा आधार घेत होता.

कृष्ण हा समाजाचा उद्धार करणाऱ्या आणि त्याला वळण लावणाऱ्या श्रेष्ठ पुरुषांपैकी एक मानला गेलेला आहे. तो अवतारी पुरुष आहे. गीताकारांपैकी एकाने त्याच्या तोंडी स्वत:विषयी 'धर्माला ग्लानी येते आणि अधर्म वाढतो तेव्हा मी अवतार घेऊन साधूंचे संरक्षण आणि दुष्टांचा नाश करतो आणि धर्माची संस्थापना करतो' असे वचन घातले आहे. अर्थात त्याचा आचार हा आदर्श आचारच मानला जाणार. त्याच्या सोयशास्त्राने अमलात आलेले आचार जर आदर्शात धरले तर त्या आदर्शाचे स्वरूप कसे होईल? न्यायाधीशपदावरच्या एका गीताभ्यासी सद्गृहस्थांनी आपल्या प्रवचनात व लेखनात कृष्णाच्या सत्य आणि असत्य यांविषयीच्या सोयशास्त्राचे समर्थन केले आहे. ते वाचून माझ्या मनात आले की, जर या न्यायाधीशांपुढे आलेल्या एखाद्या खटल्यात एखाद्या साक्षीदाराने हे सोयशास्त्र कृष्णाने सांगितलेले आदर्श मानून खोटी साक्ष दिली तर ते न्यायाधीशांच्या नियमात बसेल काय? अशी साक्ष परमेश्वराची किंवा भगवद्गीतेची शपथ घेऊन देता येईल काय?

अर्थात त्या काळी आणि अगदी आजतागायत अशी लोकमान्य आणि शास्त्रमान्य समजूत आहे की राजकारणात कुटिलता चालू शकते, ती धर्माला बाध आणीत नाही. राजकारणात राजकारणी मुत्सद्द्यांना जर धर्म कुटिलतेची मुभा देऊ शकत असेल तर व्यापार-व्यवहारकारणात व्यापाऱ्यांना ती का असू नये? कुटिलतेशिवाय– फसवणुकीशिवाय– लुबाडल्याशिवाय व्यापार चालणारच नाही असे व्यापारीही म्हणतातच. मग ब्राह्मणांनीही धर्मकर्माच्या कामी कुटिलता आणून अज्ञानी लोकांना भ्रमात का ठेवू नये आणि त्यांच्या भ्रमाचा लाभ का घेऊ नये? कलि-

युगाचे पुराणात वर्णन करताना धर्मपुरुषाचे एक एक पाय तोडीत तोडीत गेल्यामुळे कलियुग आले असे सांगितले आहे. ते सत्य नाही काय ?

अलीकडे गांधीजींनी राजकारणात आणि व्यापारातसुद्धा सत्य-अहिंसा सोडून वागणे हे अधर्म्य आहे, सत्याचा धर्म हा मानवी जीवनाच्या इतर अंगांप्रमाणेच राजकीय अंगालासुद्धा लागू आहे असे आग्रहपूर्वक सांगितले आणि एका महान देशाचे राजकारण करून ते आचरणात आणून दाखविले, किंबहुना ते दाखविण्याकरिताच त्यांनी राजकारण केले. त्यांच्यामुळे राजकारणासकट समाजजीवनाच्या सर्व वागणुकींना मोजण्याची एक मापपट्टीच लोकमानसात निर्माण झाली आणि बुद्धिवादी विद्वानांनादेखील त्या मापपट्टीचा अनादर करणे शक्य राहिलेले नाही. पण ही मापपट्टी पांडवकाळीही नव्हती असे नाही, कारण कृष्णाची ही कपटकृत्ये 'कृष्णकृत्ये' म्हणूनच त्याच्या शत्रूंनी त्याच्या तोंडावर सांगितली आहेत आणि कृष्णाने ती कबूल केली आहेत. इतकेच की ती आपण 'जशास तसे' या न्यायाने आचरल्याचा त्याने दावा सांगितला आहे. 'शठं प्रत्यपि सत्यम्' चा मानदंड निर्माण झालेल्या या काळात 'जशास तसे' हा न्याय अनार्य, असभ्य आणि अधर्म्य वाटतो. त्यामुळेच कृष्णाच्या या अपकृत्यांचे आपण आज समर्थन करू शकत नाही. फार तर, शुकाप्रमाणे 'न देवचरितं चरेत्' असे म्हणून गप्प बसतो.

पण प्रश्न आहे तो भ्रष्ट राजनीतीने समाजनीतीच सबंध भ्रष्ट होते की नाही ? 'राजा कालस्य कारणम्' हे जर सत्य असेल तर भ्रष्ट राजनीती भ्रष्ट समाजजीवनालाच जन्म देणार यात शंका बाळगण्याचे कारण नाही. आज आपण जगभरच्या लोकजीवनात ते अनुभवत आहो. सामान्य नीतिधर्मात सत्यनिष्ठा, अस्तेय, जीवाविषयी आदरभाव, अव्यभिचार, इमानदारी इ. आचारधर्म येतात. या आचारधर्मांच्या अभावी समाजाचे सुरळीत जीवन कोलमडून पडेल, समाजाचा गाडा चालूच शकणार नाही. हे आचारधर्म पाळल्याने मनुष्याचा आत्मा शुद्ध होतो, शुद्ध राहतो आणि तो उत्तम नागरिक होण्याला पात्र होतो. मनुष्य आत्मज्ञानी होतो म्हणजे स्वत:च्या अंत:सामर्थ्याची त्याला जाणीव होते, तो समर्थ होतो आणि अशा समर्थ व्यक्तींचा बनलेला समाजही आत्मसमर्थ होतो. आत्मज्ञान हे मनुष्यजीवनाचे सार्थक मानले आहे, गीताग्रंथातसुद्धा ते मानले आहे. मग अनीतिमान् माणसाचे मन व बुद्धी मलिन होऊन आत्मज्ञानाची त्याची शक्ती क्षीण होते हे ओघानेच आले. जीवनाच्या इतर सर्व क्षेत्रांत नीतियुक्त आचरण, फक्त राजकारणात वाटेल तसे आचरण, असे मानल्याने राजकारणी माणसाला आत्मज्ञानी होण्याची आशा नाही आणि नीतियुक्त राहू इच्छिणाऱ्यांनी राजकारणात शिरू नये, असा अर्थ निष्पन्न होतो. गांधीजींनी या पेचावर तोडगा काढून राजकारणासकट समाज व व्यक्तिजीवनाच्या सर्व अंगांत नीतिधर्माचे आचरण करता येते व केले पाहिजे असे दाखवून दिले. केवळ साध्य सत्य व न्याय यांवर अधिष्ठित असून भागत नाही, ते साध्य साधण्याचे साधन म्हणजे उपायसुद्धा साध्याला साजेसेच असावे लागतात हा अबाधित धर्म आहे. आणि कोणीही कृष्णाची प्रत्येक कृती या धर्माच्या निकषावर आज स्वाभाविकपणे तपासून पाहणार. 'न्यायाच्या बाजूला विजय मिळवून देणे हे माझे जीवितकार्य, ते मी कोणत्याही मार्गाचा अवलंब करून सिद्धीस नेईन' हे स्वातंत्र्य माणसाला सृष्टिनियमानेच ठेवलेले नाही. कर्माचा परिणाम अपरिहार्यपणे होत असतो आणि जसे कर्म तसा परिणाम हा सृष्टिनियम ठरलेला आहे. म्हणूनच आपले सर्व कर्म आपल्या उच्च साध्याच्या कुळीशी जमणारे असणे अवश्य आहे.

म्हणून कृष्णाने पांडवांच्या विजयाकरिता केलेले कपटकर्मही अनीतीचे असे म्हणण्यास आपण बिचकता कामा नये. श्रीकृष्ण हा भारतातला श्रेष्ठ पुरुष आहे. भारत घडले ते कृष्णाच्या सूत्रसंचालनाने. कृष्ण हा मार्गदर्शक आणि क्रियाप्रेरक नसता तर कौरव-पांडव संग्राम व पांडवांचा विजय घडलाच नसता. वेळोवेळी कौरव-पांडवांच्या जीवनातील थांबलेला प्रवाह फोडून वाहता करण्याचे काम कृष्णाने केले आहे, हे कौरव व पांडव दोघांनी मान्य केले आहे. त्यामुळेच त्याला श्रेष्ठत्वाची पदवी सर्वांनी अर्पण केली होती. कृष्णामध्ये असलेले विभूतिमत्व प्रकर्षाने भारतकाव्यात प्रकट झाले आहे. या विभूतिमत्वासच पुढे व्यक्तिपूजेचे रूप आले, व्यक्तिपूजा ईश्वरपूजेत रूपांतरित झाली आणि वासुदेव कृष्ण देवावतार मानला जाऊन त्याचा भक्तिपंथ प्रचलित झाला. सर्व आदरणीय विभूतींच्या बाबतीत लोकमानसात अशी पूज्यत्वाची भावना विकसित होत

जात असल्याचे जगाचा इतिहास सांगतो. विभूतिमत्व हे, गीतेत म्हटल्याप्रमाणे, ईश्वरी तेजाचे प्रकटीकरण आहे यात शंका नाही. पण ईश्वर त्याहूनही श्रेष्ठ आहे हे विसरले जाता कामा नये. म्हणून विभूतिमत्वाचा आदर करीत असतानाही ईश्वरी नियमांना–म्हणजेच धर्माला –अपवाद करता कामा नये, कित्येक वेळा दुबळे-पणामुळे कोणाही माणसाकडून धर्मच्युती होत असली तरी त्या च्युतीला धर्माचे रूप देता कामा नये, हा दंडक आपण पाळला पाहिजे. नाहीतर अपवाद हेच नियम होण्याचा अनवस्थाप्रसंग ओढवेल आणि समाजापुढे विकृत आदर्श निर्माण होतील.

कृष्णाला 'योगेश्वर' ही संज्ञा गीतेतील कोण-त्याही योगाचा तो स्वामी होता म्हणून दिली गेलेली नसून ही ईश्वराची पदवी त्याला ईश्वर मानून गीतेत तीन ठिकाणी वापरण्यात आलेली आहे हे लक्षात घेतले पाहिजे. ईश्वर आपल्या योगमायेने हे सृष्टिचक्र चाल-वितो म्हणून त्याला ऋषीमुनींनी 'योगेश्वर' म्हटले आहे. आणि गीतेत कृष्णाला हे विशेषण ज्या ज्या अध्यायात लावले गेले आहे ते ते अध्याय कृष्णसांप्र-दायी भागवतांनी रचले आहेत हे उघड आहे.

गेल्या पाच प्रकरणांत जे भारतात कृष्णचरित्र म्हणून आढळले ते येथे मांडून आजच्या बुद्धियुक्त विचाराला त्याविषयी काय वाटते हे सांगण्याचा प्रयत्न केला आहे. ही चिकित्सा आता आपण येथेच थांबवि-ण्यास हरकत नाही. पुढच्या गीताचिकित्सेला ही चर्चा पाया म्हणून उपयोगी पडू शकेल.












# अग्निशय्या

नीलम हातेकर

४ सप्टेंबर १९८७ रोजी राजस्थानातील देवराळा गावी रूपकँवरच्य सती जाण्याने देशाला एक जबरदस्त धक्का बसला. २१व्या शतकाकडे वाटचाल करणाऱ्या भारतात हे घडू शकते या जाणिवेने अनेक सामाजिक संस्था, राजकीय पक्ष, स्त्री-संघटना खडबडून जाग्या झाल्या. मोर्चे निघाले. चर्चा झाल्या. सतीचा प्रसंग असलेल्या 'महायात्रा' या सिनेमावर बंदी घालण्यात आली. इतकेच नव्हे, तर नांदेड जिल्ह्यातील इस्लापूर येथील अतिशय जुन्या व प्रसिद्ध सतीदेवी यात्रेचे आता इस्लापूरदेवी यात्रा, असे नामकरण करण्यात आले; काहींना सत्ता गमवावी लागली. सतीविरोधी विधेयक मंजूर झाले, पण तरीसुद्धा चुनरी महोत्सव झालाच. या संदर्भातील दोषी लोकांना अटक करण्यात आली, पण देवराळा गावी सतीचा जयजयकार चालूच राहिला. १५९ वर्षांपूर्वी लॉर्ड बेंटिकने सतीप्रथा नष्ट करण्याचे प्रशंसनीय कार्य केले. त्यानंतरच्या कालखंडात कोणी स्त्री सती गेली असल्यास त्याची जाहीर वाच्यता झालेली नाही. इतकेच नव्हे, तर रूपकँवरच्या आधी देवराळा गावी ज्या स्त्रिया सती गेल्या त्यांचीही माहिती बाहेर कुणाला नव्हती. पण रूपच्या सती जाण्याने बऱ्याच गोष्टी उजेडात आल्या. आणि त्या निमित्ताने पुन्हा स्त्रीविषयक जुन्या समस्यांना उजाळा मिळाला. परिणामी सरकारने सतीविरोधी कायद्याचे विधेयक मंजूर केले.

सती प्रकरणींचे खटले चालविण्यासाठी खास न्यायालये स्थापन करण्याची तरतूद नव्या विधेयकात आहे. सती जाण्याला उत्तेजन देणाऱ्याला मृत्युदंड किंवा जन्मठेप आणि सती जाण्यास उत्तेजन देण्याचा प्रयत्न करणाऱ्याला जन्मठेप व दंड अशा शिक्षा नव्या विधेयकात नमूद करण्यात आल्या आहेत. या विधेयकातील तरतुदींन्वये १९५१ च्या लोकप्रतिनिधी कायद्यात दुरुस्ती केली जाणार आहे. सती जाण्यास प्रोत्साहन दिलेल्या व्यक्तीस संसद किंवा विधिमंडळाची निवडणूक लढविण्यास अपात्र ठरविले जाईल. अशी व्यक्ती शिक्षा भोगत असताना आणि तुरुंगातून मुक्त झाल्यानंतर पाच वर्षेपर्यंत निवडणूक लढवू शकणार नाही असे या तरतुदीत म्हटले आहे. निवडणुकीतल्या उमेदवाराने सतीच्या घटनेचा प्रचार किंवा प्रचारात तिचे उदात्तीकरण केले तर ती भ्रष्ट बाब (करप्ट प्रॅक्टिस) ठरविण्याची तरतूदही विधेयकात करण्यात आली आहे. सती जाण्यास प्रोत्साहन दिल्याचा किंवा तसे प्रोत्साहन देण्याचा प्रयत्न केल्याबद्दल एखाद्या व्यक्तीविरुद्ध खटला चालू असेल तर तसा गुन्हा आपण केलेला नाही हे सिद्ध करण्याची जबाबदारी त्याच व्यक्तीवर राहील. सती जाण्यास चिथावणी दिल्याबद्दल दोषी ठरलेली व्यक्ती ही सती गेलेल्या महिलेच्या मालमत्तेचा वारस ठरण्यास अपात्र राहील. सती-उदात्तीकरणाच्या गुन्ह्याला किमान १ ते कमाल ७ वर्षे कैद आणि ५ ते ३० हजार रुपयांपर्यंत दंड अशी शिक्षा विधेयकात नमूद करण्यात आली आहे.

सतीपूजेसंबंधीही काही तरतुदी विधेयकात करण्यात आल्या आहेत. वीस वर्षांहून अधिक काळ अस्तित्वात असलेल्या मंदिरात वा स्थळी सती गेलेल्या व्यक्तीच्या स्मृतिप्रीत्यर्थ वा सन्मानार्थ कोणत्याही प्रकारचा समारंभ, पूजा होत असेल तर तशी खात्री पटल्यावर राज्य सरकार ते मंदिर वा स्थळ नष्ट करण्याचा आदेश देऊ शकेल. कोणत्याही भागात एखादी महिला सती जाण्याची दाट शक्यता असल्याचे जर जिल्हाधिकारी वा जिल्हा दंडाधिकाऱ्यांचे मत झाले तर अशा कृतीला प्रतिबंध करण्याचे अधिकार त्यांना देण्यात आले आहेत.

या विधेयकात सतीची व्याख्या करण्यात आली आहे. कोणत्याही विधवेने पतीच्या मृत देहाबरोबर स्वत:ला जिवंतपणी जाळून अथवा गाडून घेणे किंवा अशा विधवेने इतर कोणा नातेवाईकाबरोबर, पतीशी अगर त्या नातेवाईकाशी संबंधित अशा वस्तूबरोबर स्वत:ला जाळून किंवा गाडून घेणे हेही सतीच्या व्याख्येत समाविष्ट करण्यात आले आहे. त्यात ही महिला स्वत:हून ही कृती करते की अन्य प्रकारे, याचा संदर्भ जोडला गेला नाही. सती-उदात्तीकरणाची व्याख्याही विधेयकात नमूद करण्यात आली आहे. त्यानुसार सतीच्या गौरवार्थ वा स्मृतिप्रीत्यर्थ होणारा

अनुक्रमणिका

कोणताही समारंभ साजरा करणे, सती-घटनेशी संबंधित कोणत्याही मिरवणुकीत सहभागी होणे किंवा सती गेलेल्या व्यक्तीची प्रशंसा करणारा कार्यक्रम करणे असा तपशील त्यात देण्यात आला आहे. सतीच्या गौरवार्थ मंदिर बांधणे वा कोणत्याही प्रकारे पूजा करणे हेही या व्याख्येत समाविष्ट आहे.

या विधेयकात नमूद करण्यात आलेल्या गुन्ह्यांविरुद्ध खास न्यायालयातच खटला चालविण्याची तरतूद आहे. इंडियन पीनल कोडच्या कलम ३०९ अन्वये आत्महत्येच्या प्रयत्नाला जी शिक्षा दिली जाते तीच शिक्षा सती जाण्याचा प्रयत्न करण्याच्या गुन्ह्याला द्यावी, असे विधेयकात म्हटले आहे. कारण बहुतेक प्रकरणांमध्ये सती जाऊ पाहणाऱ्या विधवेला अगर महिलेला सती जाण्यास भाग पाडले जाते, किंवा तिचे मन अस्वस्थ बनलेले असते किंवा तिची मती गुंग झालेली असते, किंवा अन्य कारणाने ती मोकळेपणी विचार करून या निर्णयापर्यंत आलेली नसते. इंडियन पीनल कोडच्या कलम ३०९ मध्ये नमूद केलेल्या गुन्ह्यांमध्ये सती जाण्याचा समावेश होऊ शकतो असे विविध उच्च न्यायालयांनी अनेक निवाड्यांमध्ये मान्य केले आहे. परंतु त्यांत नमूद केलेल्या शिक्षा सती जाण्यास प्रतिबंध करण्याइतक्या कठोर नसल्याने हे विधेयक तयार केले गेले आहे.

स्त्रीविषयक असे अनेक कायदे आपल्या देशात केले गेले. हुंडाबंदीचा कायदा आहे, पण हुंडा राजरोस घेतला जातो. नाही दिला तर हुंडाबळीची शक्यता ! सध्या तर रोजच अशा बातम्या आपण वृत्तपत्रात वाचतो. बालविवाहप्रतिबंधक कायदा आहे, पण आजही राजस्थानात शेकड्यांनी बालविवाह होतातच. काही समाजात तर अजूनही फक्त १३।१४ वर्षांची मुलगीच लग्नाला योग्य समजली जाते. ती १८ वर्षांची होऊनही तिचे लग्न झाले नाही तर तिच्यात काहीतरी खोट आहे समजले जाते. त्यामुळे, अशा समाजातील महाविद्यालयीन शिक्षण घेणाऱ्या मुलींचा विवाह जमविताना फार अडचणी निर्माण होतात. तेव्हा कोणत्याही गोष्टींचा विचार करताना आपण मूलभूत समस्येपर्यंत पोहचतच नाही. वरवरच्या मलमपट्टया तेवढ्या करीत असतो. म्हणूनच सती जाण्यामागची कारणमीमांसा आधी समजून घेऊन मगच त्याप्रमाणे कायदा केला पाहिजे व उपायही केले पाहिजेत. स्त्री स्वेच्छेने सती जाते की जबरदस्तीने, ह्या प्रश्नाची चर्चा करताना विधवांची भयानक स्थिती, त्यांना आत्महत्या करण्यास भाग पाडणारी परिस्थिती, त्यांचे शापित जीवन, जनावरांपेक्षाही वाईट अवस्था हे सर्व घटक लक्षात घेतले पाहिजेत. तोच विचार या लेखात मांडला असून विधवा-पुनर्विवाहाच्या चळवळीची आवश्यकता प्रतिपादन केली आहे. साधारणतः असे दिसते की, उच्च वर्गातील आणि आर्थिकदृष्टया स्वतंत्र असलेली विधवा आज मानाने जीवन जगू शकते. पण ग्रामीण भागात किंवा राजस्थानसारख्या राज्यातील अत्यंत सनातनी समाजातल्या विधवांचे जिणे अत्यंत लाजिरवाणे आहे. तेव्हा स्त्रीकडे–विशेषतः विधवा स्त्रीकडे पाहण्याचा सामाजिक दृष्टिकोण प्रथम बदलल्याशिवाय हे प्रश्न सुटणार नाहीत.

ज्या राजस्थानात सती जाण्याचे प्रकार अधिक घडतात त्याच राजस्थानातील चाकूस गावातील एक स्त्री म्हणते :– "आमच्याकडे विधवेचं जिणं जगण्यापेक्षा मेलेलं बरं." तिची ही बोलकी प्रतिक्रिया विधवेच्या भयाण जीवनावर किती अर्थपूर्ण प्रकाश टाकते ! विधवा झाल्यावर केस उपटायचे, काळी वस्त्रं नेसायची, अन्न दिलं तर खायचं, गुरासारखं राबायचं; आणि अन्न देतातही कसं तर कुत्र्याला टाकावं तसं वरून फेकायचं. पुरुषाशिवाय स्त्री कोणी नाही. नवरा असेल तर समाजात स्थान, नवरा गेला की जनावराचीही किंमत नाही. ती पापी आणि अशुभ. ती चालत गेली तर मागे पाणी शिंपडलं जातं.

सती जाण्यावर राजस्थानातील धौसा गावातल्या राजपूत आणि कट्टर धर्माभिमानी राजपुतांचे म्हणणे असे की, 'पुरुष श्रेष्ठ आहेत. आणि सतीबंदी करून वेश्यांची संख्या वाढवायची आहे का ?'

रूपकँवर सती गेल्यानंतर, तिथे पाहणीसाठी गेलेल्या पुण्यातील स्त्रियांना राजस्थानातील रशीदपुरा गावातील स्त्रियांनी सांगितलं की 'शक्य तो इथे राहू नका; आणि राहणारच असाल तर कुणाच्या घरी राहू नका. देवळात राहा. चौदा वर्षांवरील कोणतीही मुलगी इथे कुमारी नाही.' स्त्रियांनी बुरख्यात राहायचं. पण ही घुंगट पद्धती इतकी विचित्र आहे की, लग्न झालेल्या स्त्रीने चेहरा दाखविला की तिची लाज जाते. पण छातीवर पदर न घेता ती कुठेही हिंडली वर मात्र तिची लाज जात नाही. सतीपूजा, करवाचौथ, कार्तिक महिन्यात एक वेळा जेवायचं, अनेक व्रत-वैकल्ये

अनुक्रमणिका

आणि उपासतापासाची कडक बंधने धर्माच्या नावा-खाली स्त्रियांवर घातली जातात.

झुनझुन गावात सतीचं मोठं देऊळ आहे. त्यांच्या-तर्फे शाळा आणि महाविद्यालये चालविली जातात. शाळेतल्या मुली प्रार्थनेच्या वेळी 'सतीमाते'ची प्रार्थना करतात. एका स्त्रीच्या जळण्यातून गावाचं आणि कुळाचं नाव होतं, प्रतिष्ठा व पैसाही मिळतो. विधवेला विद्रूप वेशाची सक्ती केली जाते. तिला शरीरविक्रया-साठी भाग पाडले जाते. अशा विटंबनेला बळी पडण्या-पेक्षा सती जाणे बरे असे तिला वाटल्यास नवल नाही.

१०० वर्षांपूर्वी भरलेल्या सामाजिक परिषदेच्या संमेलनात पुर्नविवाहाची चळवळ सुरू करण्याचा प्रस्ताव मांडण्यात आला होता. तो प्रश्न आजही कालबाह्य झालेला आहे असे नाही. उच्च समजल्या जाणाऱ्या ब्राह्मणांसारख्या जातीत विधवांच्या पुर्नविवाहाचा प्रश्न आज जरी ज्वलंत नसला तरी ह्या विवाहाकडे फार मान्यतेने पाहिले जाते असे नाही. महाराष्ट्रात जरी हा प्रश्न तातडीचा राहिला नसला तरी राजस्थान, उत्तर-प्रदेश, बंगाल या प्रांतांत विधवांची स्थिती फार वाईट आहे. महाराष्ट्रात काही जातिजमातींत पाट लावतात. एखाद्या बाईने पहिला नवरा सोडून देऊन तो जिवंत असतानाही दुसरा विवाह केला तर त्याला 'पाट लावणे' म्हणतात. अशा विवाहाकडे उपहासाने पाहिले जाते. ती स्त्री एकनिष्ठ नाही असे समजले जाते. 'तुझा पाट लावला' अशा प्रकारची शिवीही त्यातून निर्माण झाली आहे. इतक्या तुच्छतेने 'पाटा'कडे पाहिले जाते. पाटापासून होणाऱ्या संततीशी विवाह करावयास कोणी राजी नसते. ह्या जातिजमातींत पाट लावला जात असला तरी विधवेचा पुर्नविवाह मान्य नाही; कारण अत्याचार करायला तिच्यासारखी दुसरी सोयीची वस्तू नाही. त्यामुळे व्यभिचाराचा दोष पुन्हा तिच्यावरच. त्यातून सुटायला गर्भपाताचा मार्ग; किंवा मुले टाकून देणे. अशा टाकून दिलेल्या अपत्यांचा सांभाळ करण्यासाठी म. फुले यांनी पहिले अनाथगृह काढले. १८६४ मध्ये पंढरपूरचे अनाथगृह लालशंकर उमाशंकर ह्या सुधारकाने काढले. चंद्रभागेच्या वाळ-वंटात ते फिरायला गेलेले असताना त्यांच्या पायाला एक मूल लागले. त्यातूनच अनाथाश्रमाची कल्पना निघाली. महाराष्ट्रात ख्रिस्ती लोकांनी अशी अनेक अनाथगृहे चालविली होती. वाईसारख्या लहानशा गावातही असा एक अनाथाश्रम मिरली मॅडमने काढला होता.

विधवेला केशवपन करून विद्रूप करण्याची चाल मराठा समाजात नव्हती व नाही. पण ब्राह्मण व उच्च वर्गांत मात्र ही चाल होती. महात्मा फुले यांनी केश-वपनाविरुद्ध चळवळ केली, बायकांच्या सभा बोलावल्या, न्हाव्यांचा संप घडवून आणला. 'सुबोध पत्रिका' आणि 'दीनबंधू' मधून लेख लिहिले. त्या वेळी इंग्लंडमधील स्त्रियांनी या उपक्रमाचे अभिनंदन केले होते.

विधवेला दुसरा विवाह करता येत नव्हता; पण एका पुरुषाला कितीही बायका करण्याची मुभा होती. श्रमजीवी वर्गांत तर दोन बायका करणे ही व्यव-सायाच्या दृष्टीने फायद्याची गोष्ट होती. कारण मग मजूर लावावा लागत नव्हता. त्यांच्या दृष्टीने द्विभार्या-प्रतिबंधक कायदा आर्थिक दृष्टया तोटयाचा होता.

कोकणातही खोताने 'बाई ठेवणे' समाजमान्य होते. 'बाई ठेवणे' हे श्रीमंतीचे लक्षण समजले जात होते. यातही विधवा स्त्रीवर अधिकार गाजविणे सोपे होते. श्री. ना. पेंडसे यांच्या 'तुंबाडचे खोत' या द्विखंडात्मक कादंबरीत 'बाई ठेवण्या'च्या प्रकाराचे असे अनेक उल्लेख आहेत. यामुळे स्त्रीच्या अनौरस संततीचा प्रश्न निर्माण होत असूनही हे सारे प्रकार चालत होते. या प्रकाराला समाजमान्यता असल्यामुळे कायद्याचे बंधन नव्हतेच.

पाटाच्या संततीला 'कडू' समजत असत. औरस संततीचे अधिकार पूर्वी 'कडूं'ना नव्हते. ते आता मिळाले आहेत. रक्तशुद्धी-वंशशुद्धी हे पुर्नविवाह न करण्याचे आणखी एक कारण होते. कारण पुर्नविवा-हाची संतती अशुद्ध रक्ताची समजली जात असे. अशा अनौरस संततीला 'लेकावळे' म्हटले जात असे. पाटाची स्त्री मृत्यू पावली तर तिची संतती लग्नाची बायको सांभाळत असे. म्हणजे स्त्रिया बिघडल्या तर वर्णसंकर, व पुरुष बिघडला तर वर्णसंकर नाही.

पुरुषसत्ताक समाजपद्धतीत रखेली ठेवणे हे धर्म-संमत होते. काही समाजांत स्त्रियांवर बंधने फार. शिवाय नवऱ्याने मारलेच पाहिजे. त्याशिवाय नवरा कसला ! त्यामुळे प्रत्यक्ष स्त्रियांनाही अशा प्रकारच्या अत्याचारांचे काही वाटत नसे. दक्षिणेत काही समा-जांत विवाहित स्त्री प्रथम पुरोहिताकडे जायची मग पतीकडे. बंगालच्या जमीनदारी पद्धतीमुळे, वारसा-हक्काच्या कटकटी नकोत म्हणून सती जावयास भाग पाडण्याचे प्रकार फार होते. म्हणजे सती जाण्यामागे जशी विधवांची सामाजिक दुःस्थिती कारणीभूत आहे

त्याचप्रमाणे तिला जबरदस्तीने सती जायला भाग पाडण्यामागे काही आर्थिक कारणेही आहेत. विधवेला आईवडिलांकडून मिळालेले धन किंवा इतर संपत्ती, नवऱ्याच्या मृत्यूनंतर मिळालेल्या संपत्तीचा हिस्सा यांसाठी असे अत्याचार तिच्यावर होत असत.

मनुस्मृतीत स्त्रीधनाचा फार व्यापक विचार करण्यात आला आहे. 'स्त्रीधन म्हणजे ज्याच्यावर स्त्रीचा पूर्ण हक्क आहे आणि ज्याची ती मनाप्रमाणे विल्हेवाट लावू शकते असे धन.' प्राचीन हिंदू कायद्याने स्त्रीला मिळकतीसाठी किंवा ती धारण करण्यासाठी कधीही अक्षम मानले नाही; परंतु एकत्र कुटुंबपद्धतीत पुरुषाच्या उपस्थितीत तिला कधी कुटुंबाच्या मालमत्तेचा हिस्सा मिळू शकला नाही. लहानपणी पिता, तरुणपणी पती आणि वृद्धपणी मुलगा तिचे रक्षण करतो. म्हणून तिला कुठल्याही प्रकारचे स्वतंत्र अस्तित्व नाही. पुरुष हा कर्ता व मालमत्ता धारण करणारा, तिचे रक्षण करणारा मानला गेला. स्त्रीला वडिलोपार्जित मालमत्तेत हक्क नाही किंवा ती त्याची काहीही विल्हेवाट लावू शकत नाही. पण त्याच मनूने स्त्रीधनाचे दहा प्रकार सांगितले आहेत.

१) अध्यग्नी : विवाहातील होमाच्या आधी नातेवाईकाने, तिऱ्हाईताने किंवा कोणीही दिलेले धन.

२) अध्यवन्हिका : विवाहानंतर पतीच्या घरी जाताना कोणीही दिलेली भेट.

३) प्रीतिदत्त : पतीकडून, आईवडिलांकडून किंवा सासुसासऱ्यांकडून मिळालेली भेट.

४) पदवंदनिका : वडीलधाऱ्या मंडळींना नमस्कार केल्यावर मिळणारी भेट.

५) भर्तृदत्त : पतीकडून मिळालेली भेट.

६) अन्वध्येयक : विवाहानंतर सासुसासऱ्यांकडून किंवा सासरच्या नातेवाईकांकडून मिळालेली भेट.

७) बंधुदत्त : भावाकडून, वडिलांकडून, आईकडून मिळालेली भेट.

८) शुल्क : वधूशुल्क.

९) वृत्ती ( किंवा 'मेंटेनन्स अलवन्स' )

१०) अधिवेदनिका : पोटगीदाखल पतीकडून मिळालेले अन्न, वस्त्र, अलंकार.

स्त्रीधनाविषयीची जीमूतवाहनाची कल्पना अधिक स्पष्ट आहे. तो म्हणतो, "स्त्रीची अशी मालमत्ता जी ती कोणालाही देऊ शकते, विकू शकते किंवा पतीच्या परवानगीशिवाय तिची स्वतंत्र विल्हेवाट लावू शकते."

१९५६ पूर्वीच्या कायद्याप्रमाणे स्त्रीधन म्हणजे नातेवाईकांकडून व तिऱ्हाईतांकडून सप्तपदीच्या आधी व वरातीच्या वेळी मिळालेल्या भेटी, पैसे इत्यादी. फक्त स्थावररूपाने पतीकडून मिळालेल्या दायभागांतर्गत मालमत्तेला स्त्रीधन म्हणता येत नाही. कारण पतीच्या हयातीत ती त्या मालमत्तेची विल्हेवाट लावू शकत नाही. पतीच्या मृत्यूनंतर ते स्त्रीधन समजले जाईल. कुमारिका किंवा विधवा असताना देणगी म्हणून मिळालेल्या किंवा कलाकुसरीने मिळालेल्या ( by mechanical arts ) मिळकतीला स्त्रीधन समजले जाई.

मुंबई, गुजरात आणि उत्तर कोकणात मात्र स्त्रीधन म्हणजे, 'आईकडून किंवा वडिलांच्या कुटुंबियांकडून मिळालेली मालमत्ता असे समजले जाई.'

हिंदू कायद्यात स्त्रीधनाची व्याख्या पुढीलप्रमाणे केली आहे. 'In this sub-section 'property' includes both movable and immovable property accquired by a female Hindu by inheritance or device or at partition, or in lieu of maintenance or arrears of maintenance or by gift from any person whether a relative or not before, at or after her marriage, or by her own skill or exertion, or by purchase or by prescription or in any other manner whatsoever, and also any such property held by her as **Stridhan** immediately before the commencement of this Act.'

पुर्नविवाहित विधवेला हा हक्क मिळणार नाही. इतकेच नव्हे तर विधवेच्या मृत्यूनंतर तिची मालमत्ता तिच्या वारसाकडे न जाता, घरातील कर्त्या पुरुषाकडे जाते.

या कारणासाठीही स्त्रीला जबरदस्तीने सती जायला भाग पाडले जाते. तिच्या मृत्यूनंतर आपोआपच तिची मालमत्ता घरच्या कर्त्या पुरुषाच्या स्वाधीन होते. शिवाय विधवा स्त्री आपल्या मालमत्तेची विल्हेवाट लावू शकत नाही. ती फक्त उपभोक्ती असते. बिहारसारख्या प्रांतात तर विधवेचा जमीनजुमला, घरदार बळकविण्यासाठी तिला चेटकीण ठरवून ठार मारले जाते. रूपकँवरच्या सती जाण्यामागे असे आर्थिक कारण असणे अशक्य नाही.

सतीच्या चालीचे वैदिक काळाच्या प्रारंभापासूनचे संदर्भ तपासले तर असे दिसते की, साऱ्या वैदिक वाङ्मयात कोणतीही स्त्री सती गेल्याचा उल्लेख नाही. तसेच पतीनिधनानंतर पत्नीने अग्निप्रवेश करावा असे विधान आश्वलायनादी गृह्यसूत्रात किंवा मनुस्मृती, याज्ञवल्क्यस्मृती अशा स्मृतिग्रंथांतही नाही. विष्णुस्मृतीतसुद्धा तो दुय्यम दर्जाचा पर्याय सांगितला आहे. अंगिरस नावाच्या स्मृतिकाराने तर हा पर्यायसुद्धा नाकारला आहे. त्याच्या म्हणण्याप्रमाणे ब्राह्मण स्त्रीने हा दुय्यम दर्जाचा पर्यायसुद्धा आचरणात आणायचा नाही. तो आत्मघात होईल आणि तिला तसेच तिच्या पतीला स्वर्ग मिळणार नाही.

इसवी सनाच्या नवव्या शतकातला मनुस्मृतीवरील मेधातिथी हा टीकाकार सतीच्या चालीला स्पष्टपणे विरोध करतो. तो म्हणतो की, पुरुषाप्रमाणेच स्त्रीनेदेखील आत्मसमर्पण करणे निषिद्ध आहे. त्याच्या मते सती जाणारी स्त्री आपले मरण अवेळी ओढवून घेत असल्यामुळे 'माणसाने आपले ठरलेले आयुष्य पूर्ण व्हायच्या आधीच इहलोक सोडू नये', या श्रुतिवचनाच्या विरुद्ध ती आचरण करीत असते.

परंतु इसवी सनाच्या दहाव्या शतकानंतर होऊन गेलेल्या टीकाकारांनी मात्र सतीच्या चालीचा जोरदार पाठपुरावा केला आहे. सती जाणे हा एक उच्चवर्णीय स्त्रियांपुरता मर्यादित विधी न मानता, फक्त गर्भवती व ज्यांची मुले लहान आहेत अशा स्त्रिया वगळून, समाजातील बाकी सर्व स्त्रियांना लागू असलेला तो धर्म आहे असे ते मानतात.

सतीच्या चालीचे समर्थन करताना ह्या टीकाकारांनी व निबंधकारांनी त्यांना अनुकूल नसलेल्या स्मृतिवचनांची चांगलीच वासलात लावली आहे आणि अनेकदा तर नसलेली स्मृतिवचनेही अस्तित्वात असल्याचे सांगून टाकले आहे. ब्राह्मण स्त्रीने सती जाऊ नये असे स्मृतिवचन आहे. त्याचा अर्थ धर्मसिंधूत ( निर्णयसागर प्रत ) ब्राह्मण स्त्रीने वेगळ्या चितेवर सती जाऊ नये असा लावला आहे.

सतीची चाल वेदकाळाच्या पूर्वी बंद पडली होती. त्यानंतर इसवी सनापूर्वीच्या चौथ्या शतकापासून सतीचे उल्लेख सुरू होतात. परंतु प्रत्यक्ष व्यवहारात सती जाणे हा एक आवश्यक धर्म म्हणून केव्हाच स्वीकारला गेला नाही. पुढच्या काळात कदाचित असे झाले असेल की, पातिव्रत्याच्या भ्रामक कल्पनेतून स्त्रियांनी हा मार्ग स्वीकारला असावा. तिला अनेक प्रलोभने दाखविली गेली असतील. उदा., जी पतीबरोबर जाते ती जेवढे माणसाचे केस आहेत तितकी वर्षे, म्हणजे ३॥ कोटी वर्षे इतका काळ स्वर्गात राहाते :

" तिस्रः कोटयोऽर्धकोटी च यानि रोमाणि मानुषे !
तावत्कालं वसेत्स्वर्गे भर्तारं याऽनुगच्छति । "–हारीत.

किंवा साप पकडणारा जसा जोरात सापाला बिळातून वर काढतो तशी पतीला वर काढून त्याच्याच सोबत आनंदाने राहते. पती कितीही दुष्ट असो, पापी असो, पत्नीने त्याच्याबरोबर सहगमन केल्यावर त्याचा उद्धार होतो.

" ब्रह्मघ्नं वा सुरापं वा कृतघ्नं वाऽपि मानवम् ।
यमादाय मृता नारी सा भर्तारं पुनाति हि ॥ "

पुरुषप्रधान समाजव्यवस्थेत अगदीच क्षुद्र समजल्या गेलेल्या स्त्रीवर कोणत्याही मार्गाने अत्याचार करता येतात, याचीच ही उदाहरणे म्हणावी लागतील.

धर्ममार्तंडांनी विधवेचा पुर्नविवाहाचा हक्क काढून घेतला. वैदिक काळात विधवेला पुर्नविवाह करण्याची अनुमती होती. परंतु पुढे धर्ममार्तंडांनी विधवांवर अशी काही बंधने घातली की त्यांचे जीवन घोर अंधकारात बुडाले. त्यांना जगणे अशक्य झाले. धर्ममार्तंडांनी निर्दयतेची परिसीमा गाठली. एखाद्या मुलीचा विवाह ठरला, नुसता वाङ्निश्चय झाला आणि तिचा नियोजित पती निधन पावला तरी तिला लग्न करण्याची परवानगी नव्हती. तिने विधवेप्रमाणे जगावे अशी अपेक्षा होती. विधवेचे जीवन म्हणजे अभिशप्त जीवन. तिने एक वेळा जेवावे, एकच वस्त्र वापरावे आणि अलंकारांना तर स्पर्शही करू नये. तिचे दर्शन अशुभ. केशवपन करून तिला मुद्दाम कुरूप बनविण्यात येई. मग ती एखादी अजाण बालिका का असेना ! त्या काळी बालविवाहाच्या प्रथेमुळे अनेक मुलींवर लहान वयातच वैधव्याची कुऱ्हाड कोसळे. त्यांना संपत्तीचा अधिकार नव्हता, शिक्षणाचा गंध नव्हता, की पुर्नविवाहाची परवानगी नव्हती, अजूनही यात फार बदल झाला आहे असे नाही. वृंदावनच्या भजनाश्रमात दोन हजार विधवा राहतात. एक तास भजन म्हटले की त्यांना एक रुपया किंवा २०० ग्रॅम धान्य मिळते. राजस्थानात अजूनही शेकड्यांनी बालविवाह होतात, राजस्थानातील बिकानेर, टोनक, झालवार, जैसलमेर, जोधपूर या गावांत, सरकारी बंदी असतानाही, बालविवाह होतच असतात. सरकारदप्तरी त्याची कधीच नोंद नसते. या सामूहिक विवाहप्रसंगी बाहेरच्या माणसाला उपस्थित राहू दिले जात नाही.

या बालविवाहाचा अतिशय भयानक परिणाम म्हणजे बाल-विधवांच्या संख्येत वाढ. पतीचा मृत्यू, पतीने गाव सोडून जाणे किंवा पत्नीला हाकलून देणे याचे फार भयानक परिणाम या बालवधूंना भोगावे लागतात.

राजस्थानातील पटेल जमातीमधील बालविधवांना पुर्नविवाहाचा हक्क नाहीच; पण पतीच्या मृत्यूनंतर त्यांना एखाद्या म्हाताऱ्याच्या गळ्यात, Common-Law Wife ( रूढ पत्नी ? ) म्हणून, बांधण्यात येते. तेथील वैष्णवांमध्ये मात्र 'देवरपट्टया'ची प्रथा आहे. घरातील मोठ्या मुलाचा मृत्यू झाल्यास, लहान मुलगा आपल्या भावजयीला पत्नी म्हणून स्वीकारतो. राजेंद्रसिंग वेदींच्या 'एक चादर मैलीसी' या कादंबरीचा विषयच हा आहे. राजपुतांमध्ये तर बालविधवेला पुर्नविवाहाचा हक्क नाही, किंवा तिला दुसऱ्या माणसाच्या आश्रयाने राहताही येत नाही. ती आपल्या कुटुंबियांच्या दयेवर जगत असते.

महाराष्ट्रात १२० वर्षांपूर्वी विष्णुशास्त्री पंडितांनी स्त्रीपुर्नविवाहाची चळवळ सुरू केली. अनेक व्याख्याने दिली. स्वतः विधवेशी पुर्नविवाह केला. आणि स्त्रीपुनर्विवाहाला धर्मशास्त्रात आधार नाही असे म्हणणाऱ्या धर्ममार्तंडांची तोंडे सशास्त्र आधार दाखवून बंद केली.

विवाह हा स्त्री-पुरुषांच्या जीवनातील सर्वांत महत्त्वाचा संबंध. या संबंधाविषयी हिंदुधर्मात अत्यंत बारकाईने विचार केलेला आढळतो. उभयता स्त्री-पुरुष स्वधर्माने व एकविचाराने चालल्यास कधीच भंग न पावणारा हा संबंध आहे. पण दुर्दैवाने पतिनिधनाचे दुःख वाट्याला आल्यास त्या स्त्रीचे जीवन तसेच व्यर्थ जाऊ नये म्हणून पुर्नविवाहाचाही बारीक विचार करण्यात आला आहे. ही मोकळीक देणारा साक्षात वेदपुरुष आहे; आणि मनु, कात्यायन, वसिष्ठ, प्रजापती, शातातप, नारद, हारीत व पराशर हे आठ महर्षी आहेत.

यजुर्वेदाच्या तैत्तिरीय आरण्यकाच्या सहाव्या प्रपाठकाच्या पहिल्या अनुवाकात अग्निहोत्र्याच्या और्ध्वदेहिक कर्मात स्त्रीविषयक दोन श्लोक आहेत. एक तिने पतीच्या मृत्यूनंतरही इहलोकी राहण्याविषयी व दुसरा पुर्नविवाह करण्याविषयीचा आहे.

इयं नारी पतिलोकं वृणाना। निपद्यत उप त्वा मर्त्य प्रेतम्।
विश्वं पुराणमनुपालयंती। तस्यै प्रजां द्रविणं चेह धेहि ॥

( स्त्रीपुर्नविवाह : विष्णु परशरामशास्त्री, पंडित; पृ. ६२ )

'हे मानवा, ही तुझी स्त्री अनादिकालापासून चालत आलेल्या धर्माचे पालन करणारी होत्साती पतिलोकाच्या प्राप्तीची इच्छा करणारी अशी तुझ्या अगदी निकट आली आहे. तिला येथे राहण्याविषयी आज्ञा देऊन तिची पूर्वी झालेली प्रजा व सर्व धनदौलत घेण्याविषयी तीस अनुज्ञा दे.'

दुसरा श्लोक स्त्रीला उद्देशून आहे–

उदीर्ष्व नार्यभि जीवलोकम्। इतासुमेतमुपशेष एहि।
हस्तग्राभस्य दिधिषोस्त्वमेतत्। पत्युर्जनित्वमभिसंबभूव ॥

( स्त्रीपुर्नविवाह : पृ. ६२ )

'हे स्त्रिये, तू या मेलेल्या पतीच्या समीप शयन केले आहेस तर हा जिवंत असलेल्या प्राण्यांचा समुदाय पाहून पतीजवळून ऊठ आणि इकडे ये; व पुर्नविवाह करू इच्छिणाऱ्या, पाणिग्रहण करणाऱ्या पतीच्या भार्यात्वाप्रत मुख्यत्वे करून उत्तम रीतीने प्राप्त हो.'

वरील श्लोकावरून असे दिसते की, पतीच्या मृत्यूनंतर स्त्रीला सती जाण्याचा आदेश तर नव्हताच, उलट तिला पुर्नविवाहाची अनुमती होती.

पूर्वीचा पती मृत झाला म्हणूनच नव्हे तर अन्य काही कारणासाठी हे पुर्नविवाह करता येण्याची अनुमती होती. मनूने अशी, पुर्नविवाहाची अनुज्ञा, दिलेली आहे.

नष्टे मृते प्रव्रजिते क्लीबे च पतिते तथा।
पंचस्वापत्सु नारीणां पतिरन्यो विधीयते।

(स्त्रीपुर्नविवाह : पृ. ६४)

'पूर्वीचा पती देशांतरास जाऊन नाहीसा झाला, मेला, संन्यस्त झाला, नपुंसक निपजला अथवा वारला तर या पाचही आपत्तींच्या प्रसंगी दुसरा पती करणे विहित आहे.'

कात्यायनांच्या म्हणण्याप्रमाणे–

स तु यद्यन्यजातीयः पतितः क्लीब एव च।
विकर्मस्थः सगोत्रो वा दासो दीर्घामयोऽपि वा।
ऊढाऽपि देया साऽन्यस्मै सप्रावरणभूषणा ॥

(स्त्रीपुर्नविवाह : पृ. ६५)

'अन्य जातीचा, बाटलेला, नपुंसक, विरुद्ध कर्म करणारा, सगोत्र, दास, दीर्घरोगी अशा पतीबरोबर विवाह झाला असला तरी ती वस्त्रभूषणांसहवर्तमान दुसऱ्या पतीस द्यावी.'

अनुक्रमणिका








प्रजापती, शातातप, नारद, हारीत या महर्षींनीही वरील विविध कारणांनी स्त्रीच्या पुर्नविवाहाला अनुमती दिली आहे. वसिष्ठ म्हणतात :

कुलशीलविहीनस्य षंढादिपतितस्य च ।
अपस्मारिविधर्मस्य रोगिणां वेषधारिणाम् ।।
दत्तामपि हरेत्कन्यां सगोत्रोढां तथैव च ।।

(स्त्रीपुर्नविवाह : पृ. ६५)

"ज्याचे कूल अथवा शील हीन आहे, जो नपुंसक, बाटलेला, अपस्माररोगी, विरुद्ध धर्माचा, दीर्घरोगी व सोंग घेणारा यास विवाह करून दिलेली कन्या परत घेऊन दुसऱ्यास द्यावी. सगोत्र पतीशी लग्न लावलेली कन्याही दुसऱ्या पतीस द्यावी.'

प्रजापतीही वरील मतांशी सहमत आहेत. ते सांगतात—

यदि सा बालविधवा बलात्त्यक्ताऽथवा क्वचित् ।
तदा भूयश्च संस्कार्या गृहीत्वा येन केन चित् ।।

(स्त्रीपुर्नविवाह : पृ. ६६)

'ती स्त्री जर बालविधवा असेल अथवा पतीने बलात्काराने टाकलेली अशी अक्षता असेल तर तिचे ग्रहण करून पुर्नविवाह करावा.'

नारदांनी बाराव्या विवादपदात तर याचा विस्ताराने विचार केला आहे.

नष्टे मृते प्रव्रजिते क्लीवे च पतिते पतौ ।
पंचस्वापत्सु नारीणां पतिरन्यो विधीयते ।। ९७ ।।
अष्टौ वर्षाण्यवेक्षेत ब्राह्मणी प्रोषितं पतिम् ।
अप्रसूता तु चत्वारि परतोऽन्यं समाश्रयेत् ।।९८।।
क्षत्रिया षट् समास्तिष्ठेदप्रसूता समात्रयम् ।।
वैश्या प्रसूता चत्वारि द्वे वर्षे त्वितरा वसेत् ।।९९।।
न शूद्रायाः स्मृतः काल एष प्रोषितयोषिताम् ।
जीवति श्रूयमाणे तु स्यादेष द्विगुणोऽवधिः ।।१००।।
अप्रवृत्तौ तु भूतानां दृष्टिरेषा प्रजापतेः ।
अतोऽन्यगमने स्त्रीणामेष दोषो न विद्यते ।।१०१।।

(स्त्रीपुर्नविवाह : पृ. ६८)

" एक पती नाहीसा झाला, मेला, संन्यस्त झाला, नपुंसक असला, बाटला तर स्त्रीस दुसरा पती करणे विहित आहे. पती देशांतरास जाऊन नाहीसा झाला असता ज्या ब्राह्मण स्त्रीस अपत्य झाले आहे तिने आठ वर्षे त्याची मार्गप्रतीक्षा केली पाहिजे व जीस अपत्य झाले नाही तिने चार वर्षे मार्गप्रतीक्षा केली पाहिजे. त्यानंतर दुसरा पती करावा. अपत्य झालेल्या क्षत्रियेने, सहा वर्षे वाट पाहिली पाहिजे व ते न झालेल्या क्षत्रियेने तीन वर्षे वाट पाहिली पाहिजे. अपत्य झालेल्या वैश्य स्त्रीने चार वर्षे, ते न झालेल्या वैश्य स्त्रीने दोन वर्षे वाट पाहिली पाहिजे. शूद्र स्त्रीच्या बाबतीत मात्र अवधी धरू नये. देशांतरास गेलेला पती जिवंत आहे अशी नुसती वार्ताच असली तर सांगितल्याप्रमाणे अवधी दुप्पट धरला पाहिजे. याप्रमाणे वाट पाहून पुढे स्त्रीने अन्य पती करावा असे ब्रह्मदेवाचे मत आहे."

याप्रमाणे एक तैत्तिरीय आरण्यकातील श्रुती व मनू, कात्यायन, वसिष्ठ, प्रजापती, शातातप, नारद, हारीत व पराशर या आठ महर्षींच्या स्मृती या निर-निराळ्या अनेक आपत्तींच्या प्रसंगी विवाहित स्त्रीच्या पुर्नविवाहाविषयी अनुज्ञा देणाऱ्या आहेत.

स्त्रीपुर्नविवाहासाठी धर्माने दिलेल्या या अनुज्ञा आपण विसरलो. मात्र सतीचा धर्म आपण जपून ठेवला आणि आजच्या आधुनिक युगातही स्वार्थासाठी समाज-पुरुषाने त्याचा वापर केला.

सतीबंदीचा कायदा झाला. तरी कलकत्ता उच्च न्यायालयाने सती राणी मंदिरातील सतीच्या रोजच्या पूजेला परवानगी दिली. ही अनुमती मिळताच त्या ठिकाणी लोक यात्रा भरविण्याच्या तयारीला लागले. जगद्गुरू शंकराचार्यही, 'ही हिंदू धर्माची आज्ञा आहे' असे म्हणून सतीप्रथेला पाठिंबा देतात. श्रीमंत माधवराव पेशव्यांबरोबर रमाबाई सती जातात किंवा काही अपरिहार्य परिस्थितीत होणारा रजपूत रमणींचा जोहार ह्या अपवादात्मक परिस्थितीत घडलेल्या घटना होत्या; तो काही धर्म नव्हता. असामान्यांचे निकष सामान्यांना लावून त्याचे नियम बनविता येणार नाहीत. म्हणूनच सती जाण्यामागील आर्थिक व सामाजिक कारणांचा विचार करूनच त्यावर उपाययोजना केली पाहिजे.

**संदर्भ—**

१) स्त्री-पुर्नविवाह; विष्णु-परशरामशास्त्री, पंडित; सन १८७०.
२) सती, म. अ. मेहेंदळे; नवभारत, जाने. ८८.



# नोबेल पारितोषिके : १९८८

अशोक नारायण ठाकूर

साहित्य, रसायनशास्त्र, अर्थशास्त्र, वैद्यक (किंवा शरीरक्रियाविज्ञान), शांतता आणि भौतिकी या सहा क्षेत्रांतील मानवी कल्याणाच्या दृष्टीने केलेल्या उपयुक्त कार्याला दर वर्षी नोबेल पारितोषिके देण्यात येतात. या वर्षी या सहाही क्षेत्रांतील पारितोषिके देण्यात आली आहेत. ही पारितोषिके अकरा तज्ज्ञ आणि एक संस्था यांच्यात विभागली गेली आहेत. पैकी मानव्यविद्येच्या क्षेत्रातील पारितोषिके एक साहित्यिक, एक अर्थशास्त्रज्ञ आणि एक संस्था (शांततेचे) यांना देण्यात आली आहेत; तर विज्ञान व तंत्रविद्या क्षेत्रांतील प्रत्येक पारितोषिक तीन-तीन व्यक्तींना देण्यात आले आहे. म्हणजे या क्षेत्रांतील संशोधन ही एकांडी शिलेदारी उरली नसून सांघिक कार्य झाल्याचे हे द्योतक आहे. पारितोषिकविजेत्या व्यक्ती सहा देशांतील असून त्यांच्यात नेहमीप्रमाणे अमेरिकनांनी आघाडी मारली आहे. या अकरा विजेत्यांमध्ये चार अमेरिकेचे, तीन पश्चिम जर्मनीचे आणि ईजिप्त, फ्रान्स, ब्रिटन व स्वित्झर्लंड या देशांतील प्रत्येकी एकेक व्यक्ती आहे. या अकरा जणांत फक्त एकच स्त्री आहे.

या वर्षीच्या साहित्याच्या पारितोषिकाचे वैशिष्टय म्हणजे ईजिप्तमधीलच नव्हे, तर अरबी भाषेतील साहित्यिकाला हा मान प्रथम लाभला आहे. अर्थशास्त्राच्या बाबतीतही असेच घडले असून फ्रेंच अर्थशास्त्रज्ञाला हे पारितोषिक मिळण्याची ही पहिलीच वेळ आहे. साहित्याच्या पारितोषिकाचा निर्णय जसा विजेत्याच्या दृष्टीनेही अनपेक्षित होता; तसाच भौतिकीतील पारितोषिकाचा निर्णयही सुखद धक्का देणारा होता. भौतिकीतील विजेत्यांना तर आपली ही संधी संपलेली आहे, असेच वाटत होते. भौतिकी, अर्थशास्त्र, वैद्यक या क्षेत्रांतील पारितोषिकप्राप्त संशोधनाचे समान वैशिष्टय म्हणजे ते ३०–४० वर्षांपूर्वीचे आहे, हे आहे. रसायनशास्त्रातील संशोधन हे आदिम रासायनिक विक्रियेविषयीचे म्हणजे मूलभूत प्रकारचे आहे, तर वैद्यकातील संशोधन हे विज्ञानाच्या तंत्रवैज्ञानिक अनुप्रयुक्तीच्या (उपयोग करून घेण्याच्या) स्वरूपाचे आहे. रसायनशास्त्रातील विजेते अगदी तरुण आहेत तर त्या मानाने वैद्यकातील विजेते वृद्ध आहेत. साहित्य व भौतिकी या विषयांच्या बाबतीतील निर्णय अनपेक्षित होता; तर रसायनशास्त्रातील निर्णय तेवढा गुप्त राहू शकला नाही; त्यामुळे निदान विजेत्यांना तरी तेवढा तो अनपेक्षित ठरला नाही. उलट, शांततेच्या पारितोषिकासाठी रेगन व गार्बोचेव्ह ही संभाव्य नावे वाटत होती; परंतु हा अंदाज खरा ठरला नाही.



## साहित्य

नगीब मफौज (नजीब माहफौज) हे साहित्याचे नोबेल पारितोषिक मिळविणारे पहिलेच अरबी लेखक आहेत. एके काळी ईजिप्तमध्ये बंदी घालण्यात आलेल्या 'चिड्रेन ऑफ गेबलावी' या त्यांच्या साहित्यकृतीला १९८८चे साहित्याचे नोबेल पारितोषिक देण्यात आले आहे. ही घोषणा करताना ८ सदस्यांच्या स्विडिश अकादमी ऑफ लेटर्सने मफौज यांच्या साहित्याचा पुढीलप्रमाणे गौरव केला आहे : "मफौज यांचे साहित्य पूर्णपणे वास्तववादी असून त्यात मानवी भावनांच्या सूक्ष्मतर छटा व्यक्त होतात. त्यांच्या साहित्यातील संदिग्धताही माणसाची जिज्ञासा चाळविते. त्यांचे साहित्य सर्वांशी संवाद साधू शकते व त्यांची आकर्षक निवेदनशैली सर्व थरांतील लोकांना समजू शकते."

ईजिप्तचे परराष्ट्रमंत्री इस्मत अब्देल मागा दी यांनी यावर पुढील प्रतिक्रिया व्यक्त केली : हा काही फक्त नजीब यांचा गौरव नाही. ही साऱ्या ईजिप्तच्याच अभिमानाची घटना आहे. बहुतेक अरबी बुद्धिवंतांना या बातमीबद्दल तेवढे आश्चर्य वाटले नाही. कारण त्यांनी हे कधीतरी अपेक्षिले होते. त्यांच्या मते या पारितोषिकामुळे मफौज यांचे साहित्य अरबी जगापलीकडे मान्यता पावेल व पोचेल. ज्येष्ठ साहित्यिकांच्या मते यामुळे अरबी भाषा व ईजिप्तचा सांस्कृतिक विकास यांना प्रोत्साहन मिळेल. अर्थात, काही अरबी विचारवंतांना हे पारितोषिक म्हणजे राजकीय निर्णय वाटतो.

कारण मफौज यांनी १९७२ सालीच इस्त्राएलशी शांतता-विषयक बोलणी करायला सुचविले होते; तसेच १९७९ सालच्या ईजिप्त-इस्त्राएल यांच्यामधील कॅंप-डेव्हिड शांतता करारास पाठिंबा देऊन त्यांनी त्याची भलावणही केली होती. परिणामी त्यांच्या लेखनावर बऱ्याच अरब देशांत बंदी होती व विशेषतः सिरिया-सारख्या कडव्या अरबांनी या राजकीय हेतूने देण्यात आलेल्या पारितोषिकाविषयी आपला राग व्यक्त केला आहे. मात्र पुष्कळ अरबी वृत्तपत्रांनी हा अरबी भाषेचा सन्मान आहे, असे नमूद केले आहे. काहींच्या मते त्यांच्या मध्यममार्गी व उदात्तवादी विचारसरणीमुळे त्यांना हे पारितोषिक देण्यात आले असावे. त्यांनी देशाची कीर्ती वाढविल्याने त्यांचा पुतळा कैरोच्या ग्रंथालयाच्या आवारात उभारण्याचा निर्णय सांस्कृतिक खात्याने घेतला आहे. तर त्यांच्या गौरवार्थ १ नोव्हेंबर १९८८ रोजी कैरोत आंतरराष्ट्रीय समारंभ आयोजिण्यात आला होता व त्यात राष्ट्राध्यक्ष होस्नी मुबारक यांचे भाषण झाले. इतर अरब देशही त्यांचा सत्कार करण्याचा विचार करीत आहेत.

वामकुक्षीच्या वेळी ही बातमी आली व पत्नीने त्यांना उठवून ती सांगितली. ती ऐकून ते चकितच झाले व म्हणाले, "या पारितोषिकासाठी माझे नाव सुचविण्यात आल्याचे मला माहीतच नव्हते. माझे नाव कोणी सुचविले होते ?" आपल्या साहित्याविषयी ते म्हणाले, "कदाचित ते आधुनिक अरबी साहित्याप्रमाणे चवथ्या वा पाचव्या दर्जाचे असेल ! ... मात्र भूतकाळात थोर अरबी लेखक नक्कीच होते...... यापूर्वी यासाठी माझी शिफारस करण्यात आली असल्यास तेव्हा या स्पर्धेत थोर पाश्चात्त्य लेखक होते. (म्हणून मला ते मिळाले नसेल) ... मला जे रुचते तेच मी लिहितो." त्यांना आताच्या त्यांच्या राजकीय दृष्टिकोणाविषयी विचारले असता ते म्हणाले की, इतर अरब देशांनीही इस्त्राएलबरोबर शांतता स्थापण्यासाठी ईजिप्तचे उदाहरण गिरवावे, कारण "वांझोटया युद्धांनी मर्यादित संपत्तीची पुरेशी वाट लावली आहेच."

मफौज यांचा जन्म कैरो येथे ११ डिसेंबर १९११ रोजी झाला. त्यांचे वडील सनदी नोकरीत होते व त्यांना ४ बहिणी व २ भाऊ असून ते सर्वांत धाकटे आहेत. त्यांनी कैरो विद्यापीठाच्या कला विद्याशाखेतून तत्त्वज्ञानाची पदवी १९३४ साली संपादन केली. त्याच वर्षी ते ईजिप्तच्या सनदी सेवेत सांस्कृतिक खात्यात रुजू झाले व १९७१ साली तेथूनच सेवानिवृत्त झाले. धर्मादाय मंडळ, चित्रपट समीक्षण मंडळ, ईजिप्तमधील चित्रपटविषयक सहकारी संघटना इत्यादी विभागांत त्यांनी संचालक, सल्लागार यांसारख्या जबाबदारीच्या पदांवर काम केले. अशा तऱ्हेने त्यांचे बहुतेक आयुष्य कैरोतच गेले. त्यामुळे त्यांच्या साहित्यात कैरो शहर व त्यासभोवतालच्या परिसरातील समाजजीवन यांचे प्रतिबिंब पडलेले दिसते.

'भाषेच्या पोलादी पडद्यामुळे' (ब्रिटिश लेखक जॉन फाउल्सचे शब्द) पुष्कळसे अरबी लेखन व सांस्कृतिक विचार बाहेरच्या जगापासून दडून राहतात. शिवाय लिखित अरबी भाषा अनौपचारिक व घरगुती स्वरूपाची असल्याने ती इतर भाषांत अनुवादित करणे अवघड असते. यात भर म्हणजे मफौज प्रसिद्धिपराङ्मुख आहेत व प्रवाहपतित होणे त्यांच्या स्वभावात नाही. त्यामुळे ते मुलाखती विशेष देत नाहीत. प्रवासाचा कंटाळा असल्याने आतापर्यंत ते दोनदाच परदेशी गेले आहेत. या सर्व गोष्टींमुळे त्यांच्याविषयी वा त्यांच्या खाजगी आयुष्याविषयी फारच थोडी माहिती उपलब्ध आहे. आत्मचरित्रपर लेखनातही व्यक्तिगत माहितीला ते फाटा देतात. अगदी नोबेल समितीलाही त्यांच्याविषयी काही जास्त माहिती देता आली नाही. त्यांची दृष्टी मंद झाली असून ऐकायलाही कमी येते. शिवाय अशक्त प्रकृतीने प्रवासाची दगदग सहन होत नाही. त्यामुळे पारितोषिक स्वीकारायला ते स्वतः गेले नाहीत. त्यांच्या फत्मी व ओम्काल्यूम या दोन मुलींनी त्यांच्यातर्फे हे पारितोषिक १० डिसेंबर १९८८ रोजी स्वीकारले. कैरोतील एका ठरावीक कॉफीगृहास नित्य भेट देणे हाच काय तो त्यांचा बाहेर पडण्याचा नेम आहे.

अर्थात, १९४९ नंतर तेथील लोक त्यांना त्यांच्या कथा-कादंबऱ्यांमधूनच ओळखू लागले. शिवाय त्यांनी अनेक चित्रपटांच्या कथा लिहिल्या. तसेच त्यांच्या साहित्यकृतींवर चित्रपट व दूरचित्रवाणीच्या मालिकाही निघाल्यात. त्यांची पुस्तके स्वस्त असल्याने त्यांच्या लक्षावधी प्रती अरब जगतात खपल्या आहेत. अशा तऱ्हेने लेखक म्हणून त्यांची व त्यांच्या साहित्यकृतींमधील पात्रांची अरबी जनतेला चांगली माहिती झालेली आहे.

मफौज यांनी लेखनास सुरुवात केली तेव्हा ईजिप्तमध्ये काव्य ह्या साहित्य-प्रकाराची चलती होती व

कादंबरीला गौण स्थान होते. कारण कादंबरीचा तेथील इतिहास केवळ शतकाएवढाच जुना होता. अर्थात, त्यांनी कादंबऱ्यांशिवाय लघुकथा, नाटके, पटकथा व निबंध यांसारखे विविध साहित्यप्रकार हाताळले आहेत. त्यांच्या लेखनामागे द्रव्यप्राप्ती ही प्रेरणा कधीच नव्हती; तर जीवनासाठी कला हे तत्त्व त्यांनी स्वीकारले होते. त्यांच्या लेखनात दाहक वास्तवतेचे दर्शन होते. ईजिप्तमधील विसाव्या शतकातील वसाहतवादी तसेच निरंकुश सत्ता यांतील अनुभव अशाच वास्तवतेने त्यांनी कथन केले आहेत. अरब जगतातील संघर्षात्मक प्रवृत्ती व अरबांच्या विचारसरणीतील महत्त्वाची वैशिष्टये त्यांच्या साहित्यात प्रतिबिंबित झालेली आढळतात. पुनरुज्जीवनवाद व योगायोगाने येत असलेली आधुनिकता यांच्या कात्रीत सापडलेल्या व्यापारी, गरीब व मध्यमवर्गीय समाजांचे बोलके चित्रण त्यांनी केले आहे. अशा तऱ्हेने विशेषकरून गेल्या ५०–६० वर्षांतील ईजिप्तमधील जीवनाचे वास्तव दर्शन त्यांच्या जोमदार साहित्यातून घडते. त्यांच्या लघुकथांना १९६८ नंतर खरा बहर आला असून त्यांत त्यांची ध्येयनिष्ठ वृत्ती दिसून येते. सध्या ते अल–अहराम या दैनिकातून एक साप्ताहिक मालिका लिहीत असून सेवानिवृत्तीपासून (१९७३) या दैनिकात लेखन करीत असतात.

मफौज यांच्या साहित्याविषयी नोबेल समिती म्हणते : " वैशिष्टयपूर्ण कलात्मक प्रकार म्हणून त्यांच्या कादंबऱ्या उच्च दर्जाच्या असून त्यामुळे अरबी बोलणाऱ्या सांस्कृतिक वर्तुळातील साहित्यिक भाषेच्या विकासाला चालना मिळाली आहे. त्यांच्या साहित्याचा आवाका याही पलीकडील असून ते सर्व संवेदनशील व्यक्तींशी संवाद साधू शकते. "

मफौज यांच्या साहित्याचे तीन कालखंड पडतात : (१) १९३९–१९४४ चा प्रारंभीचा काळ–या काळात त्यांनी तीन कादंबऱ्या लिहिल्या. त्यांमध्ये प्राचीन ईजिप्तच्या इतिहासाचा आढावा घेतल्यासारखे दाखविले असले, तरी त्याचा वापर त्यांनी अलीकडच्या काळातील ईजिप्तमधील राजेशाहीमधील परिस्थितीवर टीका करण्यासाठी रूपकाप्रमाणे केला आहे. (२) १९४५–१९५७ दरम्यानचा सामाजिक कालखंड– या काळात ते सामाजिक विषयांकडे वळले व त्यांनी वास्तववादाच्या टीकात्मक रीती वापरण्यास सुरुवात केली. तसेच दोन महायुद्धांदरम्यानच्या काळातील फुटकळ बूर्ज्वा लोकांची स्थिती व मन:स्थिती त्यांनी योग्य रीतीने वर्णिली आहे. ' द बिग ट्रायॉलॉजी ' ही त्यांची सर्वोत्कृष्ट साहित्यकृती याच काळातील आहे. (३) १९५७ नंतरचा तत्त्वमीमांसक कालखंड– या काळात त्यांच्या लेखनाच्या शैलीत व आशयात मोठे बदल घडून आले. या काळात ते तत्त्वज्ञान व आदर्शवाद यांच्याकडे वळले. श्रद्धा आणि तर्क, विज्ञान आणि धर्म यांच्यातील परस्परसंबंध, तसेच जीवनाचा अर्थ, नवीन समाजव्यवस्था, समाजवाद, क्रांती वगैरे विषयांचे त्यांनी केलेले चिंतन त्यांच्या या कालखंडातील लेखनात दिसून येते.

मफौज यांच्या ४० कादंबऱ्या व कथासंग्रह, आणि कित्येक नाटके प्रसिद्ध झाली असून ३० पेक्षा अधिक चित्रपटकथाही त्यांनी लिहिल्या आहेत. त्यांच्या १२ कथासंग्रहांचे इंग्रजीत तसेच काही साहित्यकृतींचे जर्मन, फ्रेंच व स्विडिश भाषांत अनुवाद झालेले आहेत. १९४४ पर्यंत त्यांची ५ पुस्तके प्रसिद्ध झाली होती. पैकी तीन काहीशा परंपरागत वाटणाऱ्या ऐतिहासिक कादंबऱ्या होत्या, एक कथासंग्रह होता व एक ' प्राचीन ईजिप्त ' नावाचा लेखसंग्रह होता. १९४९–५६ या काळात त्यांचे लेखन जवळजवळ थांबल्यासारखे वाटले; पण नंतर थोड्याच काळात त्यांची ३५ पुस्तके प्रसिद्ध झाली. नासर ईजिप्तचे अध्यक्ष असतानाच्या काळात त्यांच्या लेखनात मोठे परिवर्तन झाले. त्यामुळे त्यांना प्रसिद्धी व अर्थप्राप्तीही झाली, तरी ईजिप्त व इतर अरब देशांतील लष्करी व धार्मिक नेत्यांची त्यांच्यावर इतराजी होऊन काही पुस्तकांवर काही ठिकाणी बंदीही घालण्यात आली. त्यांच्या काही महत्त्वाच्या साहित्यकृतींची थोडक्यात माहिती पुढे दिलेली असून तीवरूनही त्यांच्या साहित्यातील कार्याची कल्पना येईल.

' बैन अल-कासरैन ' हे त्यांचे विशेष गाजलेले पुस्तक ' द बिग् ट्रायालॉजी ' वा ' ट्रायॉलॉजी ' या नावाने ओळखले जाते. बैन अल-कासरैन (द कॅसल ऑफ डिझायर, खंड १, १९५६), कास्र अश्शाक (बिट्विन द कॅसल्स, खंड २, १९५७) आणि अस सुक्कारिया (द शुगर बाऊल, खंड ३, १९५७) या तीन कादंबऱ्यांचा यात समावेश असून यामुळेच त्यांना भरपूर लोकप्रियता लाभली. हे काहीसे आत्मचरित्रपर निवेदन मानले जाते. यात १९१७–१९४४ या काळातील एका मध्यमवर्गीय

परंपरागत कुटुंबातील तीन पिढ्यांच्या नजरेतून ईजिप्तच्या स्थितीची कथा सांगितली आहे. अशा प्रकारे ईजिप्तमधील या काळातील राजकीय, सांस्कृतिक व सामाजिक उलथापालथींचा आढावा घेण्याचा हा प्रयत्न आहे. यात त्यांनी कैरो शहराचे वर्णन केलेले असून त्याची तुलना चार्ल्स डिकन्सने केलेल्या लंडन शहरातील झोपडपट्टीच्या वर्णनाशी व झोलाने केलेल्या पॅरिसच्या वर्णनाशी केली जाते.

'चिड्रेन ऑफ गेबलावी' (१९५९) या कादंबरीत त्यांनी माणसाला आध्यात्मिक मूल्यांविषयी असणारी सनातन ओढ हा विषय हाताळला आहे. यात धर्मविषयक चर्चा आलेली असून तीमुळे कडव्या मुस्लिमांचा रोष त्यांनी ओढवून घेतला. यात प्रेषित महंमद, मोझेस व ख्रिस्त यांचा उल्लेख आलेला असून ते एका आधुनिक रस्त्यावरून चालले होते असे वर्णन आहे. परंपरावादी लोकांना ही बाब निखालस पाखंडी वाटणे साहजिकच होते. शेवटी धार्मिक नेत्यांच्या दबावामुळे या कादंबरीवर १९५९ साली बंदी घालण्यात आली. यामुळे त्यांचा मूलतत्त्ववाद्यांबरोबरचा संघर्ष सुरू झाला.

'अल-काहिरा अल-जाहिदा' (न्यू कैरो, १९४५) यात त्यांनी परिचित समकालीन व्यक्तींचे सामाजिक समीक्षेच्या व मानसशास्त्रीय दृष्टीने चित्रण केले आहे. अशा तऱ्हेने यात ईजिप्तच्या स्थितीची गंभीरपणे दखल घेतली असून याची भाषा साधी, सोपी, गद्य व कधीकधी बोलभाषेच्या पातळीवर उतरणारी आहे. यात त्यांचे वास्तववादी भान प्रथमच प्रकर्षाने जाणवले व यामुळे अरबी साहित्यात एक नवा प्रवाह आला. या पुस्तकामुळे ते प्रथम लोकांपर्यंत पोचले व त्यांचा थोडा आर्थिक लाभही झाला.

'खान खलिली' या कादंबरीत आधुनिक कैरोतील एका सोनार/सराफ गल्लीचे बहारदार वर्णन केले आहे. नाकासमोर चालणारी माणसे, त्यांची वस्ती व कनिष्ठ मध्यमवर्गीय वृत्ती यांचे जिवंत चित्रण यात केले आहे. म्हणून ही कादंबरीही लोकप्रिय झाली.

'मिदाक अली' (मिदाक गल्ली, १९४७, अनुवाद-१९७५) या कादंबरीचे सर्वांत जास्त अनुवाद झाले आहेत. यात हमीदा नावाच्या एका वेश्येचे प्रभावी चित्रण केले आहे. हशीश ओढणारी, माणसांना पंगू बनवणारी हिच्यासारखी पात्रे आजही कैरोच्या गल्ल्यांतून पाहायला मिळतात.

जेव्हा राज्यकर्त्यांविषयी ब्र काढण्याची कोणाची हिंमत नसे त्या काळात महफौज यांनी 'चॅट ऑन द नाईल' व 'मिरामार' (१९६७) या कादंबऱ्या लिहिल्या. आणि विशेषतः नासरच्या राजवटीवर अप्रत्यक्ष टीका केली.

यांशिवाय 'बिदाया वा निदाजा' (बिगिनिंग अँड एंड, १९४९), 'अल-लिस वा 'ल-किताब' (द रॉबर अँड द डॉग्ज, १९६१), 'क्वेल्स इन ऑटम' (१९६२) 'अत-तारिक' (द वे, १९६४), 'अश शाहहाध' (द बेगर, १९६५) ह्या त्यांच्या काही गाजलेल्या कादंबऱ्या असून त्यांचे काही गाजलेले कथासंग्रह पुढील होत : 'द व्हिस्पर ऑफ मॅडनेस' (१९३८), 'दुनिया 'इल्लाह' (अल्लाज वर्ल्ड, १९६३), 'बायन सागी अत्सुमा' (हाउस ऑफ इलफेम, १९६५) 'ताहता अल-मिझाला' (अंडर द अंब्रेला, १९६९), 'अॅट द साइन ऑफ ब्लॅक कॅट' (१९६९) आणि 'ए स्टोरी विदाउट बिगिनिंग ऑर एण्ड' (१९७१, १२ आवृत्त्या).

एवढे विपुल लेखन केले असताना आणि वयाची पंचाहत्तरी ओलांडलेली असतानाही त्यांची लेखनावरची निष्ठा व त्याविषयीची आस्था जशीच्या तशी टिकून आहे. म्हणूनच अलीकडे दिलेल्या एका मुलाखतीत ते म्हणाले होते, "ज्या दिवशी माझी लेखनाची ओढ (ऊर्मी) संपेल, तो माझ्या आयुष्यातील 'शेवटचा दिस' असावा, अशीच माझी इच्छा आहे."

## रसायनशास्त्र

१९८८ सालचे रसायनशास्त्राचे नोबेल पारितोषिक पश्चिम जर्मनीतील तिघा शास्त्रज्ञांना संयुक्तपणे देण्यात आले आहे. निसर्गातील सर्वांत आदिम अशा सर्वांत महत्त्वाच्या प्रकाशसंश्लेषण (फोटोसिंथेसिस) या क्रियेविषयी महत्त्वपूर्ण संशोधन केल्याबद्दल त्यांना हा बहुमान मिळाला आहे. जीवसृष्टीचा मूलाधार असणाऱ्या या क्रियेच्या मुळाशी किंवा गाभ्याशी प्रथिनांचा एक जटिल समूह असून या प्रथिनांच्या रेणूंची त्रिमितीय रचना अणू-अणूंनी उघड करण्याचे मोलाचे कार्य या तिघांनी केले आहे. अशा तऱ्हेने या संशोधनामुळे प्रकाशसंश्लेषण नेमके कसे होते म्हणजे प्रकाशाच्या रूपातील ऊर्जेचे रासायनिक रूपातील ऊर्जेत कसे परिवर्तन होते याविषयीचे प्रश्न सोडविण्यात या तिघांना

सर्वप्रथम यश मिळाले आहे, असे हे पारितोषिक देणाऱ्या रॉयल स्विडिश अकादमीने म्हटले आहे.

रोबेर्ट ह्यूबेर (५१), योहान डीझेनहोफर (४५) व होटमुट मिचेल (४०) या तिघा तरुण शास्त्रज्ञांना हे पारितोषिक मिळाले आहे. म्युनिख येथील माक्स प्लांक इन्स्टिटयूट ऑफ बायोकेमिस्ट्री या संस्थेचे ह्यूबेर हे व्यवस्थापकीय संचालक आहेत; तर सध्या येथील माक्स प्लांक इन्स्टिटयूट फॉर बायोफिजिक्स येथे असलेले मिचेल हे एखादे द्रव्य अलग करण्याच्या व त्याचे बारकाईने तपशीलवार निरीक्षण करण्याच्या कामी पटाईत आहेत आणि हल्ली डलास येथील हार्व्हर्ड ह्यूजेस मेडिकल इन्स्टिटयूटमध्ये असलेले डीझेनहोफर हे प्रतिभाशाली वैज्ञानिक बिनचूक निष्कर्ष काढण्यामध्ये कुशल आहेत.

सूर्यप्रकाशाच्या ऊर्जेच्या मदतीने कार्बन-डायऑक्साइड वायू व पाणी (पाण्यातील हायड्रोजन) यांच्यापासून कार्बोहायड्रेटांसारखी कार्बनी संयुगे तयार करण्याचे काम हरितद्रव्ययुक्त सजीव पेशी करीत असतात. या क्रियेला प्रकाशसंश्लेषण म्हणतात. ही संयुगे ही अंतिमतः सर्व जीवसृष्टीच्या अन्नाचा आदिम स्रोत असतात. अशा तऱ्हेने सूर्याच्या प्रकाशातील ऊर्जेचे या संयुगांतील रासायनिक ऊर्जेत परिवर्तन करणारी ही क्रिया आहे. ही रासायनिक ऊर्जा वा अन्न सर्व सजीव म्हणजे वनस्पती व प्राणी वापरतात. म्हणून सदर अकादमीने म्हटले आहे, " प्रकाशसंश्लेषण ही पृथ्वीवरची सर्वांत मूलभूत महत्त्वाची जीवरासायनिक किंवा रासायनिक क्रिया आहे ! "

प्रकाशसंश्लेषणातील हरितद्रव्याचे महत्त्व काय असते, हे आधीच समजलेले होते; परंतु हरितद्रव्य थोडाच प्रकाश शोषते हेही लक्षात आले होते. पुढे याच्याशी निगडित असलेल्या प्रथिनांद्वारे प्रकाश मोठ्या प्रमाणात शोषला जातो हे कळून आले. आणि गुंतागुंतीच्या व अनेक टप्प्यांच्या प्रकाशसंश्लेषणाच्या क्रियेच्या मर्मस्थानी ही प्रथिने असतात हे पुष्कळांना कळून चुकले. नंतर या प्रथिनांची रचना समजून घेण्याचे प्रयत्न करण्यात येऊ लागले. त्यासाठी पुरेशा प्रमाणात ही प्रथिने मिळवावयाची होती व नंतर त्यांचे निरीक्षण करायचे होते. तांत्रिक अडचणींमुळे ही दोन्ही कामे साध्य करण्यात अडथळे येत होते.

मिचेल यांनी याकरिता प्रकाशसंश्लेषण करणाऱ्या जांभळट सूक्ष्म जंतूंवर (शास्त्रीय नाव-ऱ्होडसस्यूडोमोनस व्हिरिडिस) लक्ष केंद्रित केले. यांच्यातील जांभळट –तपकिरी रंगद्रव्यामुळे त्यांना जांभळट रंग आलेला असतो व तो रंगही हे सूक्ष्म जंतू वेगळे ओळखण्याची खूण आहे. प्रकाशसंश्लेषण क्रियेचे मर्मस्थान वा गाभा म्हणून ओळखल्या जाणाऱ्या व या जीवांच्या पेशीच्या बाहेरच्या पटलावर बद्धरूपात असणाऱ्या प्रथिनांच्या जटिल समूहावर मिचेल यांच्या संशोधनाचा सर्व भर होता. पटलाला बांधलेल्या स्वरूपात ही प्रथिने काहीशी वनस्पतीप्रमाणे भासतात म्हणजे या वनस्पतींचा पर्णसंभार (वा शृंगिका किंवा फायकोएरिथ्रिन हे रंगद्रव्य) पेशीच्या पृष्ठावर आलेला असतो व पटलातील आकडयांनी तो धरून ठेवलेला असतो. त्यांचा खोडासारखा भाग फायकोसायनिन या रंगद्रव्याचा बनलेला असतो आणि पेशीच्या आतल्या भागात गेलेल्या मुळांसारख्या स्पर्शिका ह्या ॲलोफायकोसायानिन नावाच्या रंगद्रव्यांच्या बनलेल्या असतात. वृक्षासारखी ही प्रथिने प्रकाश शोषत असल्याने त्यांना 'अँटेना' (आकाशक) असेही म्हणतात. वरील अकादमीने मात्र या प्रथिनसमूहाचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे: "लिपिडे या रसायनांच्या दोन रेणूंएवढ्या जाड अशा एका थरात ज्याचे शरीर असते, तसेच ज्याचे पाय व डोके ही पाण्यात (द्रवात) असतात असा हा प्रथिनसमूह आहे. "

प्रथम या प्रथिनांच्या रेणूंच्या अध्ययनात अडचणी येत गेल्या. उदाहरणार्थ, पेशीपटलापासून ही प्रथिने अलग करण्याच्या पद्धतीत ती खराब होऊन जात. शेवटी १९८२ साली ही प्रथिने पेशींपासून काळजीपूर्वक अलग करण्यात यश आले. तसेच ती स्फटिकरूपात मोठ्या प्रमाणात मिळविण्यातही यश लाभले. अशा तऱ्हेने मिचेल यांनी सर्वप्रथम या पटल-प्रथिनांचे मोठे त्रिमितीय स्फटिक मिळविले व ते त्यांनी वरील सूक्ष्मजंतूंच्या संशोधनातून मिळविले.

असे मोठे स्फटिक उपलब्ध झाल्यावर या तिघांचे यशस्वी सांघिक कार्य सुरू झाले. क्ष-किरणांच्या साहाय्याने आणवीय तपशीलाचे पृथक्करण करण्याच्या दृष्टीने हे स्फटिक पुरेसे मोठे होते. तदनंतर तीन वर्षे ह्यूबेर यांच्या मार्गदर्शनाखाली या प्रथिनांच्या जटिल समूहातील १० हजार अणूंची रचना वा मांडणी निश्चित

अनुक्रमणिका

करण्यासाठी प्रयत्न करण्यात आले. यासाठी स्फटिकांची रचना तपशीलवारपणे उघड करणाऱ्या क्ष-किरण-विषयक सुविकसित तंत्रांचा वापर करण्यात आला. अर्थात हे काम अत्यंत कष्टाचे होते. १९८४ साली त्यांनी आपले निष्कर्ष प्रथम जाहीर केले. त्यानुसार प्रकाश-संश्लेषणाचे मर्मस्थान असणाऱ्या या प्रथिनसमूहाचा मधला भाग ५० अँगस्ट्रॉम लांबीच्या दंडगोलासारखा असून या एकूण समूहाचा व्यास १४० अँगस्ट्रॉम असल्याचे दाखवून दिले. (१ अँगस्ट्रॉम म्हणजे एका सेंटिमीटरचा १० कोटचांश एवढा भाग असतो). या स्फटिकांचे क्ष-किरणांनी अनेक आकृतिबंध मिळाले. त्या आकृतिबंधांचे विश्लेषण त्यांनी केले. १९८५ साली या संपूर्ण मर्मस्थानाची (प्रथिन समूहाची) रेणवीय रचना मिचेल यांनी जाहीर केली. म्हणजे त्यांनी यातील वेगवेगळ्या १० हजार अणूंची अवकाशात झालेली मांडणी, परस्परांतील संबंध, लगतचे अणू कसे जोडले गेले आहेत, त्यांच्यात किती अंतर आहे आणि समग्र समूहाचे अवकाशातील त्रिमितीय स्वरूप कसे आहे हे समजून घेण्यात नेत्रदीपक यश मिळविले.

अशा तऱ्हेने हा शोध म्हणजे केवळ एक छाप पाडणारा तांत्रिक स्वरूपाचा पराक्रम नाही; तर यामुळे जीवविज्ञानातील एक सर्वात महत्त्वाची प्रथिन-रचना उघड झाली, हे अधिक महत्त्वाचे काम होय. अणु-अणूंनी उघड झालेली या प्रथिनांची रचना इतकी स्पष्ट होती की, तीमुळे प्रकाशसंश्लेषणातील ऊर्जा-परिवर्तन कसे घडते याविषयीच्या अनुमानांची खातरजमा झाली आणि हे विलक्षण गूढ पुढीलप्रमाणे उकलले गेले.

प्रकाशसंश्लेषणात या प्रथिनसमूहाभोवतीच्या रंजकद्रव्यांच्या रेणूंमधील इलेक्ट्रॉन प्रकाश शोषतात आणि ही प्रकाशपुंजांची ऊर्जा जलदपणे मर्मस्थानाकडे हस्तांतरित होते (नेली जाते). म्हणजे ती फायकोएरिथिनाकडे, तेथून फायकोसायनिनाकडे आणि तेथून ॲलोफायकोसायनिनाकडे जाते.

अशा तऱ्हेने सूक्ष्मजंतु-हरितद्रव्य (बॅक्टिरिओ-क्लोरोफिल) उत्तेजित होते. नंतर या हरितद्रव्याकडून एक इलेक्ट्रॉन एका ग्राहकाला (रिसेप्टर) दिला जातो. इलेक्ट्रॉनच्या या अदलाबदलीने ऊर्जा निर्माण होते. ही ऊर्जा प्रथिनसमूहामार्फत पाण्याचे ऑक्सिडीभवन होण्यासाठी वापरली जाते. यामुळे ऑक्सिजन वायू मुक्त होतो. तसेच यातूनच हायड्रोजन व इलेक्ट्रॉन हे अन्य घटक निर्माण होतात. त्यांच्यामुळे कार्बन डाय-ऑक्साइड वायूचे क्षपण (म्हणजे इलेक्ट्रॉन ग्रहण केला जाण्याची) क्रिया होते व शेवटी कार्बोहायड्रेटांसारखी कार्बनी संयुगे निर्माण होतात. अशा तऱ्हेने सौर ऊर्जेचे रासायनिक ऊर्जेत रूपांतर झाल्याने अन्ननिर्मिती होत असते. या अन्नातील रासायनिक ऊर्जा जीवाला हवी तेव्हा वापरता येते. अशा प्रकारे त्या तिघांनी जीवसृष्टीतील एक सर्वांत मूलभूत असे आश्चर्यकारक गूढ उकलले आहे. यामुळेच पुढील प्रकारची गोष्ट वैज्ञानिकांना शक्य कोटीत येईल असे वाटू लागले आहे: प्रकाशसंश्लेषण करणाऱ्या वरीलसारख्या रेणूंच्या आराखड्याबरहुकूम सौरविद्युतघट तयार करणे ही ती गोष्ट होय.

या वर्षीच्या रसायनशास्त्राच्या नोबेल परितोषिकाच्या संदर्भातील दोन मजेशीर घटना अशा : या पारितोषिकाच्या दृष्टीने पात्र असलेले मिचेल यांचे संशोधन छापण्यास 'नेचर' या प्रतिष्ठित साप्ताहिकाने प्रथम नकार दिला होता. अर्थात नंतर त्याचे महत्त्व लक्षात आल्यावर ते छापले, ही गोष्ट वेगळी.

नोबेल पारितोषिकविजेत्यांच्या नावांविषयी खास गुप्तता पाळली जाते. मात्र या वर्षी रसायनशास्त्राच्या नोबेल पारितोषिकविजेत्यांच्या नावांबद्दल ही गुप्तता राहिली नव्हती खरी ! कारण या पारितोषिकाची घोषणा होण्याच्या काही आठवडे आधीच ते नेमके कोणाला मिळणार याची खात्रीशीर बातमी सर्वत्र पसरली होती. त्यामुळेच जेव्हा रोबेर्ट ह्यूबेर यांना स्वीडनवरून ही बातमी सांगणारा फोन आला, तेव्हा ती साजरी करण्यासाठी लागणारी शँपेनची बाटली त्याच्या हाताशी तयारच होती !

## अर्थशास्त्र

या वर्षीचे अर्थशास्त्राचे नोबेल स्मृति-पारितोषिक मॉरिस अलाइस यांना मिळाले असून हे पारितोषिक एखाद्या फ्रेंच अर्थशास्त्रज्ञाला मिळण्याची ही पहिलीच वेळ आहे. साधनसंपत्तीचा व्यापार किंवा बाजारपेठा आणि तिचा योग्य वा कार्यक्षम रीतीने वापर करून घेणे यांविषयीचा सिद्धांत मांडून त्यांनी अर्थशास्त्रात मोलाची भर टाकली असल्याने त्यांना हे पारितोषिक देण्यात आले आहे. एकूण बाजारपेठेच्या समतोला-विषयीच्या सिद्धांताचेही त्यांनी नेमके गणितीय विश्लेषण केले आहे. शिवाय त्यांनी मांडलेले अनेक सिद्धांत व

त्यांची पुष्टी करणारी गणितीय सूत्रे हीही नोबेल समितीने विचारात घेतली होती.

१७ ऑक्टोबर १९८८ रोजी सकाळी त्यांना फोनद्वारे ही बातमी समजली तेव्हा त्यांनी पुढीलप्रमाणे आपली प्रतिक्रिया व्यक्त केली : " हे पारितोषिक मला आतापर्यंत झुलवीत आलेले आहे. कारण पुष्कळ वर्षांपासून या पारितोषिकांसाठी माझे नाव अधूनमधून घेतले जात होते. त्यामुळे हे पारितोषिक मिळण्याची आशा मी सोडूनच दिली होती. म्हणून ही बातमी तशी अनपेक्षितच म्हणावी लागेल."

अर्थात, नोबेल समितीच्या अध्यक्षांच्या उद्गारात या उशीराची कारणमीमांसा आढळते, ते म्हणाले, " मॉरिस यांच्या कामाचा प्रचंड व्याप व गुंतागुंत यांमुळे त्यांना अनुसंधान करण्यास दीर्घकाळ लागला आहे." तर या पारितोषिकाची घोषणा करताना रॉयल स्विडिश ॲकॅडेमी ऑफ सायन्सेसने म्हटले होते, "१९४८-च्या सुमारास मॉरिस यांनी संशोधनाद्वारे काही महत्त्वपूर्ण निष्कर्षांविषयीचे भाकीत केले होते. या निष्कर्षांमधूनच १९५५–६५ दरम्यानच्या काळात आर्थिक विकासाविषयीचा सिद्धांत पुढे आला. " या घोषणेत त्यांच्या संशोधनकार्याचे महत्त्व पुढीलप्रकारे विशद केले आहे : " त्यांच्या अर्थशास्त्रीय विचारांचा प्रभाव अप्रत्यक्षपणे पडला असला, तरी तो दूरगामी स्वरूपाचा आहे. अधिक तरुण अर्थशास्त्रज्ञ आपल्या संशोधनामध्ये मॉरिस यांच्या संशोधनाचा–सूत्रांचा–वापर करीत असतात; तसेच फ्रान्सबाहेर जाणारे त्यांचे विद्यार्थी त्यांच्या कल्पनांचा इतरत्र प्रसार करीत असतात."

मॉरिस यांचा मुक्त बाजारपेठेवर ठाम विश्वास आहे. दुसऱ्या महायुद्धानंतर कित्येक यूरोपीय देशांमध्ये मोठ्या सरकारी मक्तेदारी (एकाधिकार) संस्थांचे जणू पेवच फुटले होते. अशा संस्थांचे व्यवस्थापन कार्यक्षमपणे कसे करता येईल यावर अलाइस यांनी आपले लक्ष केंद्रित केले होते. या दृष्टीने फ्रेंच व्यवस्थापनाखालील रेल्वे ( एस एन सी एफ ) उद्योगातील साधनसंपत्तीचा उपयोग कार्यक्षमपणे कसा करून घेता येईल याचे त्यांनी विश्लेषण केले होते.

दुसऱ्या महायुद्धानंतर फ्रान्सची नव्याने उभारणी करणे आवश्यक होऊन बसले होते आणि सर्व पंथांतील बहुतेक फ्रेंच अर्थशास्त्रज्ञांनी याकरिता राष्ट्रीयीकरणाची कास धरायला हवी, अशी भूमिका घेतली होती. मात्र अलाइस याला अपवाद होते. या काळात फ्रान्सचे औद्योगिक धोरण ज्या प्रकारे ठरविण्यात आले त्याला अलाइस यांनी कडाडून विरोध केला होता. फ्रान्सबाहेर अलाइस विशेष परिचित नसले, तरी त्या देशातील ते सर्वांत प्रभावी अर्थशास्त्रज्ञ आहेत व त्यामुळे ते राष्ट्रीयीकरणाची भलावण करणाऱ्यांविरुद्ध जोरदार आवाज उठवू शकले. या संदर्भात त्यांनी पुढीलप्रमाणे युक्तिवाद केला होता. सरकारने चालविलेले मक्तेदारी उद्योग जेव्हा बाजारपेठांतील प्रेरणांनुसार ( घटकांनुसार ) किमती ठरवितात आणि साधनसंपत्तीचे वाटप करतात तेव्हाच अशा उद्योगांची कार्यक्षमता कमाल असते. अखेरीच अलाइस यांच्या म्हणण्याची प्रचीती आली आणि १९७५ च्या सुमारास फ्रान्सला औद्योगिक धोरणात घुमजाव करून वाटचाल करायचा निर्णय घ्यावा लागला. म्हणजे अनेक राष्ट्रीयीकृत उद्योग पुनश्च खाजगी क्षेत्रात आणायचा निर्णय घ्यावा लागला. अर्थात या निर्णयाने सर्वाधिक आनंद अलाइस यांना झाला असणे स्वाभाविकच आहे.

अलाइस यांचा जन्म पॅरिसला ३१ मे १९११ रोजी एका दुग्धव्यावसायिकाच्या घरी झाला. त्यांचे शिक्षण पॅरिस येथील एकोल पॉलिटेक्निक आणि एकोल नॅशनेल सुपिरियर रेस माइन्स येथे झाले. अभियांत्रिकीची पदवी संपादन केल्यावर १९४८ पर्यंत त्यांनी खाणकामाशी संबंधित अशा नोकऱ्या केल्या. मात्र याआधी ते अमेरिकेत गेले होते. तेथे त्यांना 'महामंदी' चे प्रत्यक्ष दर्शन घडले व यामुळे ते अर्थशास्त्राच्या अभ्यासाकडे वळले होते. कारण ते तेव्हा म्हणाले होते, " १९३३ साली मी अमेरिकेत होतो. त्या वेळी तो देश म्हणजे जणू कारखान्यांचे कबरस्तान झालेला होता. आणि असे का घडले हे जाणून घेणे मला आवश्यक वाटले." पुढे त्यांनी इकोल नॅशनेल सुपिरियर रेस माइन्स येथे अर्थशास्त्राचे अध्यापक व अर्थशास्त्रीय विश्लेषणाचे प्राध्यापक म्हणून काम केल्यावर ते तेथील अर्थशास्त्रीय संशोधन केंद्राचे संचालकही झाले. नंतर पॅरिस विद्यापीठाच्या संख्याशास्त्रीय संस्थेत ते अर्थशास्त्रीय सिद्धांत या विषयाचे प्राध्यापक (१९४७–६८) आणि जिनिव्हा येथील ग्रॅजुएट इन्स्टिट्यूट ऑफ इंटरनॅशनल स्टडीज या संस्थेचे संचालक (१९६७–७०) होते. १९६० साली त्यांचा विवाह

अनुक्रमणिका

जॅकलीत बूटे लूप यांच्याशी झाला व त्यांना एक मुलगी आहे. पोहणे व स्किईंग हे त्यांचे आवडते छंद आहेत.

अलाइस यांना अनेक पारितोषिके, पुरस्कार, पदके व इतर सन्मान मिळालेले आहेत. उदाहरणार्थ, लँकेस्टर पारितोषिक, अमेरिकन सोसायटी फॉर द ऑपरेशन्स रिसर्चचे सुवर्णपदक, राष्ट्रीय औद्योगिक प्रोत्साहनपर सुवर्णपदक, लिजन द ऑनर वगैरे.

अलाइस यांनी विपुल लेखन केले असून ते मुख्यत्वे फ्रेंच भाषेत केले आहे. त्यांची ग्रंथसंपदा विपुल असून नियतकालिके व वर्तमानपत्रांतूनही त्यांनी लेखन केले आहे. अर्थशास्त्राशिवाय त्यांनी भौतिकी व इतिहास या विषयांवरही लेखन केले आहे. त्यांच्या ग्रंथांच्या पुढील इंग्रजी नामावलीवरूनही त्यांच्या विपुल व व्यापक संशोधनकार्याची कल्पना येऊ शकेल : द रोल ऑफ कॅपिटल इन इकॉनॉमिक डिव्हलपमेंट (१९६३), द कंडिशन्स ऑफ द एफिसियन्सी इन द इकॉनॉमी (१९६७), ग्रोथ विदाउट इन्फ्लेशन (१९६८), ग्रोथ अँड इन्फ्लेशन (१९६९), फर्गेटफुलनेस अँड इंटरेस्ट (१९७२), द जनरल थिअरी ऑफ सरप्लस अँड पॅरेटोज फंडामेंटल काँट्रिब्युशन (१९७३), इन-इक्वॅलिटी अँड सिव्हिलिझेशन (१९७३), द सायकॉलॉजिकल रेट ऑफ इन्टरेस्ट (१९७४), एक्स्पेक्टेड युटिलिटी हायपोथेसिस अँड द अलाइस पॅराडॉक्स (१९७९), फ्रिक्वेन्सी, प्रॉबॅबिलिटी अँड चान्स (१९८२), द फाउंडेशन्स ऑफ द थिअरी ऑफ युटिलिटी अँड रिस्क (१९८४), डिटरमिनेशन ऑफ कार्डिनल युटिलिटी (१९८५), द कन्सेप्ट्स ऑफ सरप्लस अँड लॉस अँड द रिफॉर्म्युलेशन ऑफ द थिअरीज ऑफ स्टेबल जनरल इकॉनॉमिक इक्विलिब्रियम अँड मॅक्झिमम एफिसिएन्सी (१९८५), द इंपिरिकल अॅप्रोचेस ऑफ द हेरिडिटरी अँड द रिलेटिव्हिस्टिक थिअरी ऑफ द डिमांड फॉर मनी (१९८५) वगैरे.

१९४३–५२ या काळात त्यांचे प्रमुख ग्रंथ (फ्रेंच) प्रसिद्ध झाले व त्यामुळे त्यांना प्रसिद्धी मिळाली. 'इन सर्च ऑफ अॅन इकॉनॉमिक डिसिप्लीन' या अर्थाचे शीर्षक असलेले त्यांचे १९४३ साली प्रसिद्ध झालेले ९०० पृष्ठांचे पुस्तक क्रांतिकारक ठरले. त्यांच्या या लेखनामुळेच फ्रेंच अर्थशास्त्रज्ञांचा एक नवा पंथ निर्माण झाला. ही मंडळी मोठ्या सार्वजनिक मक्तेदारी उद्योगांमध्ये अलाइस यांचा सिद्धांत वापरतात. दगडी कोळसा व वीज यांसारख्या वस्तूंच्या किंमती एखाद्या मक्तेदारी संस्थेकडून समाजाच्या दृष्टीने सर्वोत्कृष्ट पातळीवर कशा स्थिर केल्या जातात हे दाखविणाऱ्या अलाइस यांच्या सूत्रांचा प्रभाव सर्वाधिक पडला आहे. याशिवाय अलाइस यांनी आर्थिक संबंधांविषयीचे अनेक सिद्धांत मांडले आहेत उदाहरणार्थ व्याजाचे दर, आर्थिक विकास व गुंतवणूक यांच्यातील परस्परसंबंध वगैरे.

सरकारच्या सेवानिवृत्तीविषयीच्या अधिकृत (पण खुळचट) धोरणांमुळे त्यांना जवळजवळ दहा वर्षांपूर्वीच अध्यापन सोडावे लागले. या धोरणांना हे पारितोषिक म्हणजे एक चपराकच आहे, असे त्यांना वाटते. म्हणून ते म्हणाले होते, "सध्याची माझी सेवानिवृत्तीची अवस्था कशी मूर्खपणाची आहे हे दाखवून देण्यासाठी आता माझ्यापाशी हे नोबेल पारितोषिक आहे, याचा मला खरोखरच आनंद वाटतो !"

**वैद्यक**

गेल्या काही वर्षांमध्ये सर्वसाधारणपणे विज्ञानातील नोबेल पारितोषिके ही मूलभूत प्रकारच्या वैज्ञानिक संशोधनाला देण्याची प्रथा पडली होती. वैद्यकाच्या या वर्षीच्या पारितोषिकाने हा पायंडा मोडला गेल्याचे दिसते. कारण या वर्षीचे वैद्यकाचे नोबेल पारितोषिक हे निरनिराळी औषधे निर्माण करण्यासाठी उपयुक्त ठरलेल्या संशोधनासाठी तिघा वैज्ञानिकांना देण्यात आले आहे. हा निर्णय आशादायक असून पुष्कळांच्या मते ही सर्वाधिक चांगली निवड आहे. या तिघांपैकी सर जेम्स व्हायट ब्लॅक (६४) या ब्रिटिश शास्त्रज्ञांना हे पारितोषिक औषधोपचाराची नवीन संकल्पना किंवा तत्त्व पुढे आणले, तसेच बीटा-ब्लॉकर्स व सायमेटिडीन ही मोलाची औषधे तयार केल्याबद्दल देण्यात आले आहे. जॉर्ज हर्बर्ट हिचिंग्ज (८३) व सौ. गर्ट्रूड अॅलियन (७०) या दोघांना प्युरीन व पिरिमिडीन यांच्या चयापचयातील अवरोधक (क्रिया थांबविणारी) द्रव्ये शोधून काढल्याबद्दल हे पारितोषिक देण्यात आले आहे. हे शोध म्हणजे या तिघांच्या चिकाटीची यशोगाथाच आहे ! कारण गेली चाळीस वर्षे हे तिघेही गंभीर व असाध्य अशा रोगांवरची औषधे शोधून काढण्यासाठी धडपडत आहेत. नोबेल समितीचा एक अधिकारी तसे म्हणालाही होता, "सुमारे ४० वर्षांपूर्वी त्यांनी केलेल्या संशोधनाची फळे आजही आपण चाखत आहोत."

पूर्वी रसायनशास्त्रविषयक संशोधनाच्या जाळ्यात योगायोगाने व सुदैवाने औषधिद्रव्ये सापडत असत. मात्र या पद्धतीत बदल होत असल्याचे या तिघांनी प्रथम हेरले होते. आणि सर जेम्स यांनी एक वैद्यकीय लक्ष्य ठरविले आणि नंतर त्याला अनुसरून नवीन औषधे शोधून तयार केली. अशा तऱ्हेने या क्षेत्रात एक नवीन संकल्पनाच पुढे आली. यातूनच रक्ताचा कर्करोग, हिवताप, संधिवात, अवयवरोपण व सूक्ष्मजंतूंचा संसर्ग यांसारख्या डॉक्टरांना हतबल करणाऱ्या दुर्धर रोगांवरची औषधे त्यांनी तयार केली असून अगदी अलीकडे त्यांनी एड्स (AIDS) या रोगावरचेही एक औषध बनविले आहे. खरे तर, या तिघांना यापूर्वीच हे पारितोषिक मिळायला हवे होते, असे अनेकांचे मत आहे. अशा प्रकारे या तिघांनी प्रयोगशाळेत बसूनच लाखो लोकांचे प्राण वाचविले आहेत. तसेच अशा रोगांमुळे होणाऱ्या वेदना व अंथरुणाला खिळून राहावे लागल्याने अनुभवावे लागणारे कष्ट कमी करण्याच्या प्रयत्नांना त्यांनी हातभार लावलेला आहे. म्हणूनच लंडनचे 'इंडिपेंडंड' हे वृत्तपत्र म्हणते की, हजारो डॉक्टरांनी त्यांच्या उभ्या आयुष्यात केलेल्या रुग्णसेवेपेक्षा या तिघांचे कार्य मोलाचे आहे. नोबेल पारितोषिकाचा निर्णय घेणारी स्वीडनची कॅरोलिन्स्का संस्था म्हणते, "ब्लॅक यांच्या संशोधनकार्यामुळे विविध प्रकारच्या रोगांविरुद्धची औषधे बनविण्याच्या दृष्टीने आधारभूत काम झाले आहे; तर एलियन व हिचिंग्ज यांनी १९५० च्या एक-दोन वर्षे आधी माणसाच्या निरोगी पेशी व कर्कग्रस्त पेशी यांच्यातील भेद स्पष्ट केला. कर्कग्रस्त पेशी, उपद्रवकारक जीव किंवा अनिष्ट तत्त्व यांची वाढ विवेचकपणे थांबवू शकणारी औषधे तयार करण्यासाठी त्यांचे हे संशोधन उपयुक्त आहे. त्यामुळे निरोगी पेशीला अपाय होऊ न देता कर्कग्रस्त पेशीतील न्यूक्लिइक अम्लाचे संश्लेषण थांबविले जाते."

ब्लॅक यांचा जन्म १४ जून १९२४ रोजी झाला. त्यांचे शिक्षण काउडन बीथ येथील बीथ हायस्कूल व सेंट अँड्रूज विद्यापीठात झाले. या व ग्लासगो विद्यापीठात त्यांनी अध्यापनाचे काम केले. नंतर त्यांनी इंपिरियल केमिकल इंडस्ट्रीज (आय सी आय) फॉर्मॅस्युटिकल कंपनी लिमिटेड (१९५८–६४), स्मिथ, क्लाइन अँण्ड फ्रेंच लॅबोरेटरी (१९६४–७३) या



उद्योगांत काम केल्यानंतर लंडनच्या युनिव्हर्सिटी कॉलेजात त्यांनी काम केले (१९७३–७७). १९८४ पर्यंत ते वेलकम रिसर्च लॅबोरेटरीत संचालक होते. तद्नंतर त्यांनी औषधी उद्योगाला रामराम ठोकला. कारण मोठ्या औषधी कंपन्या संशोधनात अडथळे आणतात, याची त्यांना खंत वाटते. कारण अशा कंपन्या स्थितिशील होतात. चुकीच्या तथाकथित काटकसरीच्या धोरणाचा एक भाग म्हणून सायमेटिडीन या औषधाविषयीचा प्रकल्प जवळजवळ वांझोटा झाला होता. जीवरसायनशास्त्र व औषधिविज्ञान यांवरील संशोधनासाठी पुरेसा निधी मिळत नाही अशी त्यांची तक्रार आहे. नवनवी तत्त्वे, सिद्धांत पारखून घेण्याचे स्वातंत्र्य वैज्ञानिकांना असले पाहिजे, असे त्यांना वाटते. म्हणून ते म्हणतात, "वैज्ञानिकांना अनेक प्रकारच्या दबावांखाली काम करावे लागते, हे मला मंजूर नाही. माझ्या मते यासाठी अधिक निधीची गरज आहे. त्याच्या आधारे ते आपले प्रयोग करून दाखवतील... आपल्या संशोधनाची सत्यासत्यता प्रयोगांद्वारे सिद्ध करून दाखविण्याची संधी त्यांना मिळत नाही, याचे मला वाईट वाटते." सध्या ते लंडनच्या रायन संस्थेतील संशोधकांच्या एका छोटया तुकडीला मार्गदर्शन करीत आहेत. नवीन औषधे शोधणे हा या संशोधनामागील हेतू नाही; तर औषधे शोधण्यासाठी इतरांना कोणत्या प्रकारच्या संशोधनाची मदत होऊ शकेल, ते शोधून काढणे हा यामागील हेतू आहे.

ब्लॅक गेली ३०–४० वर्षे प्रभावी औषधांचा शोध घेत आहेत. यासाठी त्यांनी पेशीच्या अंतर्गत भागाच्या कार्यावर भर दिला. आयसीआयमध्ये असताना त्यांना हृदय-शूलावरचे औषध शोधण्याची निकड भासू लागली. हृदयाचे स्नायू, रोहिण्यांची काही आवरणे, मूत्रपिंडाचे विशिष्ट भाग इत्यादी ठिकाणी बीटा–अॅड्रेनर्जिक ग्राहक (रिसेप्टर) रेणू नावाचे घटक असतात. शरीरातील नैसर्गिक अॅड्रेनॅलीन वा एपिनेफ्रीनमुळे या रेणूंचे कार्य चालू होते. त्यामुळे हृदयाच्या स्नायूंचे नियंत्रण करणाऱ्या विशिष्ट मज्जापेशी उत्तेजित होतात व यामुळे हृदयाचे स्पंदन ( धडधड ) वाढते. अशा प्रकारे हृदयाचे काम वाढल्याने त्याची ऑक्सिजन वायूची गरजही वाढते. अशा वेळी ऑक्सिजन कमी पडला की, छातीत कळा येऊ लागतात. याच दुखण्याला हृदय-शूल, उर:शूल किंवा अँजायना पेक्टोरीस असे म्हणतात. ब्लॅक यांनी या मज्जा-

पेशींचा अभ्यास केला. अॅड्रेनॅलीनमुळे होणारे या रेणूंचे उत्तेजन थांबविता आले, तर हृदयविकाराचा हा झटका टाळता वा सौम्य करता येईल, असे त्यांच्या लक्षात आले. म्हणूनच बीटा-रेणूंचे कार्य थांबविणाऱ्या द्रव्यांना बीटा-ब्लॉकर म्हणतात. त्यांनी व विल्यम डंकन यांनी १९६२ साली प्रोनेथॅलॉल हे पहिले व १९६४ साली प्रोपॅनॅलॉल हे अधिक चांगले व क्रांतिकारक बीटा-ब्लॉकर द्रव्य शोधले. यामुळे या मालिकेतील औषधिद्रव्यांच्या निर्मितीचा मार्ग खुला झाला. हृदय-शूलाशिवाय अतिरक्तदाब, हृदयस्पंदविकार ( अन्हिदमिया ), मानसिक ताण वगैरे अनेक विकारांवर ही द्रव्ये उपयुक्त ठरली आहेत व सर्रास वापरली जातात. प्रोपॅनॅलॉलच्या खपाचा उच्चांक तर अजूनही टिकून आहे. खरे तर, अशा तऱ्हेने मज्जापेशींचे उत्तेजन रोखणारे (म्हणजे बीटा-ब्लॉकर) द्रव्य अमेरिकेतील एली लिली कंपनीतील संशोधकांनी आधीच तयारही केले होते. मात्र त्याची अशा प्रकारची उपयुक्तता त्यांच्या ध्यानी आली नाही.

स्मिथ, क्लाइन अँड फ्रेंच लॅबोरेटीत दाखल झाल्यावर ब्लॅक व डंकन यांचे जठरव्रण वा पचनजव्रण यांसारख्या व्रणा (अल्सर) विरुद्धचे औषध शोधण्याचे प्रयत्न चालू झाले. या बाबतीत त्यांना तीन गोष्टी माहीत होत्या : १) आतड्यातील जाठररसाच्या जादा स्रवणाने अम्लता वाढून व्रण होतो; २) या स्रावांना हिस्टामीन या द्रव्यामुळे उत्तेजन मिळते, तसेच हे द्रव्य परागज्वर या विकारातही मुक्त होते आणि ३) परागज्वरविरोधी औषधी गोळ्यांनी व्रण बरा होत नाही. यावरून त्यांनी पुढील निष्कर्ष काढला : पेशीच्या पृष्ठभागी असणाऱ्या दोन ग्राहक-रेणूंपैकी एकाला बद्ध होऊन हिस्टामीनाची क्रिया सुरू होते. यांपैकी एक प्रकार म्हणजे एच-१ ग्राहक पचनमार्गाच्या अस्तरावरच्या पेशींवर व दुसरा म्हणजे एच-२ ग्राहक हा आतड्याच्या अस्तराच्या पेशींवर आढळतो. अॅलर्जीविरोधी औषधांची आंतरक्रिया केवळ एच-१ ग्राहकाशी होते. तर हिस्टामीन एच-२ ग्राहकावर बद्ध होते. यावर उपाय म्हणून या दोघांनी हिस्टामीनची रचना समजून घेतली व तिच्याबरहुकूम रचना असणारे एक द्रव्य संश्लेषित (कृत्रिम रीतीने तयार) केले (१९७२). तेच सायमेटिडीन हे औषधिद्रव्य होय. यामुळे एच-२ ग्राहक रेणूचे कार्य थांबते. परिणामी जठरातील अम्लता घटून वेदना कमी होतात. एवढेच नव्हे, तर जठरव्रण भरून येण्यास या उपचाराची मदत होते. टॅगॅमेंट नावाच्या औषधात सायमेटिडीन हा गुणकारी व क्रियाशील घटक असून यामुळे जठरव्रणावरील उपचाराच्या पद्धतीत आमूलाग्र बदल झाला. गेल्या दहा वर्षांत हे औषध सर्वाधिक खपले. अर्थात अशा तऱ्हेने एखादे नवीन औषध शोधून काढणे ही एक खडतर तपश्चर्याच असते. म्हणून ब्लॅक व डंकन यांनी आपल्या याविषयीच्या १९७२ सालच्या शोधनिबंधात पुढील वाक्य लिहिले होते- "सुमारे २००० संयुगांचे संश्लेषण करून व मग चाचणी घेतल्यावर त्यातून टॅगॅमेंट हे औषध हाती लागले."

वरील दोन औषधांमुळे जठरव्रण व अतिरक्तदाब यांची तीव्रता कमी झाली, तसेच हृदयविकारांनी होणाऱ्या मृत्यूंचे प्रमाण घटले हे खरेच आहे. मात्र एवढेच यांचे महत्त्व नाही, तर ब्लॅक यांच्या संशोधन पद्धतीमुळे रोगोपचाराच्या पद्धतीत एक नवीन, आगळी संकल्पना समाविष्ट झाली. म्हणजे रोगकारक द्रव्याच्या जादा निर्मितीला आळा घालण्याची कल्पना दृढमूल झाली. या संकल्पनेतूनच इतर अनेक औषधे पुढे आली.

पारितोषिक मिळाल्याचे समजल्यावर ब्लॅक यांनी संमिश्र स्वरूपाची प्रतिक्रिया व्यक्त केली. म्हणजे ती काहीशी मजेशीरही आहे व काहीशी गंभीरही आहे. ते म्हणाले, "क्षणभर मला धक्काच बसला; पण माझी बीटा-ब्लॉकर द्रव्ये माझ्या हाताशीच होती (म्हणजे या धक्क्याचा परिणाम रोखणारी द्रव्ये जवळच होती)- पण नंतर आनंद झाला. माझी पत्नी या आनंदात सहभागी होऊ शकली नाही, याचे सर्वाधिक दुःख झाले. कारण ती अलीकडेच मला सोडून गेली (वारली)... केवळ मलाच हे पारितोषिक मिळाल्याचे ऐकून तेवढे बरे वाटले नाही. कारण इतरांनीही हृदयविकारावरील औषधांचे संशोधन केले आहे." त्यांच्या हल्लीच्या संशोधनावरून ते आणखी एखादे नवे क्रांतिकारक औषध शोधण्याच्या बेतात आहेत, असे दिसते.

एलियन व हिचिंग्ज ही दोघे १९४५ पासून उत्तर कॅरोलायना येथील वेलकम रिसर्च लॅबोरेटरीमध्ये एकत्र संशोधन करीत होती. त्यांनी मुख्यत्वे पेशींच्या कार्यपद्धतीविषयी संशोधन केले आणि दोघांनी औषधिद्रव्ये बनविण्याच्या पद्धती विकसित केल्या आहेत. पेशींचे अध्ययन करताना या दोघांनी कर्कग्रस्त पेशी, रोगकारक व्हायरस व सूक्ष्मजंतू यांच्या पेशी आणि

सर्वसामान्य निरोगी पेशी यांच्या कार्यपद्धतीत व आनुवंशिक सामग्रीत कोणता भेद असतो, ते शोधून काढले. हा भेद लक्षात आल्यावर त्यांनी माणसाला उपद्रवकारक ठरणाऱ्या अशा गोष्टी नष्ट करण्याचे किंवा त्यांच्यावर उपाय योजण्यासाठी काय करायला हवे याविषयीचे संशोधन सुरू केले. फक्त रोगट पेशींवर हल्ला करणारी पण निरोगी पेशींना इजा न पोचविणारी औषधिद्रव्ये त्यांना तयार करायची होती आणि तशी औषधे त्यांनी तयारही केली. या पद्धतीचे अनुकरण इतरांनीही केले आणि अनेक रोगांवरची औषधिद्रव्ये पुढे आली. परिणामी लाखो रोग्यांवर उपचार करणे शक्य झाले. यामुळे रोग काबूत आणणे व रोग्यांचे प्राण वाचविणे शक्य झाले आहे.

या दोघांच्या संशोधनाविषयी त्यांचा एक सहकारी म्हणाला : "या दोघांनी प्यूरीन व पिरिमिडीन यांच्या चयापचयाची रीत असाधारण कुशलतेने स्पष्ट केली व तिचे तपशीलवार वर्णनही केले." हिचिंग्ज यांनी या दोन्हींवर तर एलियन यांनी पिरिमिडीनच्या संशोधनावर लक्ष केंद्रित केले होते. यातूनच रक्ताचा कर्करोग व हिवताप यांवरची औषधे विकसित झाली. एका व्यक्तीचा एखादा अवयव दुसऱ्या व्यक्तीच्या शरीरात रोपित करण्याच्या वेळी उपयुक्त ठरणारे ॲझाथायोप्रीन (इम्युरॉन) हे औषधिद्रव्य या दोघांनी बनविले आहे. यामुळे रोपित केला जाणारा परका अवयव शरीराकडून नाकारला जाण्याच्या क्रियेवर नियंत्रण ठेवता येते. यामुळे अशा प्रतिरोपणात हे सर्वाधिक प्रमाणात वापरले जाणारे औषध ठरले आहे. संधिवात व मूतखड्यावरचे ॲलोप्युरिनॉल नावाचे औषधही या दोघांनी तयार केले आहे.

हर्पिझ नावाचा विकार एका व्हायरसमुळे होतो आणि त्वचा व श्लेष्मकला यांच्यावर छोटे छोटे फोड येणे हे याचे एक प्रमुख लक्षण आहे. १९७०–८० दरम्यानच्या काळात त्यांनी या विकारावरचे असायक्लोव्हिर नावाचे सर्वांत प्रभावी औषध तयार केले. तोपर्यंत हर्पिझच्या व्हायरसाचा सामना करणारे औषध तयार करणे हे अतिशय अवघड काम होते. कारण व्हायरसाचे पुनरुत्पादन साक्षात जिवंत पेशीतच होत असल्याने त्यावरच्या औषधाचा निरोगी पेशींवर दुष्परिणाम होणार नाही, हे पहायला हवे होते. या दोघांनीच १९५०–६० दरम्यान व्हायरसमार्फत निर्माण होणारे एक एंझाइम शोधून काढले होते. यावरचे एक औषधिद्रव्य त्यांनी तयार केले. जेव्हा या औषधिद्रव्याची एंझाइमाशी गाठ पडते तेव्हा त्याची क्रिया सुरू होते. हे लक्षात घेऊन त्यांनी असायक्लोव्हिर हे औषध बेतून तयार केले. असायक्लोव्हिर हे अक्रिय वा सुप्त रूपात देण्यात येते. ते रोगग्रस्त वा व्हायरसाने संसर्गित झालेल्या पेशीपर्यंत पोचल्यावर व्हायरसातील एंझाइम क्रियाशील बनते. सुधारित असायक्लोव्हिरमुळे व्हायरसाची आनुवंशिक यंत्रणा चोंदते ( खराब होते ) व त्याचे पुनरुत्पादन थांबते. अशा तऱ्हेने या औषधाने हर्पिझ रोगाची वाढ रोखली जाते. याच्याच आधारावर या दोघांनी एड्स ( AIDS; ॲक्वायर्ड इम्युनो-डेफिसिएन्सी सिंड्रोम) या रोगावरचे सर्वांत गुणकारी ॲझिडोथायमिडीन किंवा एझेडटी हे औषध तयार केले आहे. एड्स या रोगात शरीराची रोगप्रतिकारशक्ती हळूहळू कमी होत जाऊन अकाली मृत्यू येतो. अमेरिकेच्या संघराज्याने या विकारावर हे औषध वापरायला परवानगी दिली आहे.

एलियन व हिचिंग्ज ही दोघे जीवरसायनशास्त्रज्ञ व औषधि-वैज्ञानिक आहेत. रासायनी चिकित्सा, चयापचय, विषमयवलयी कार्बनी संयुगे, न्यूक्लिइक अम्ले तसेच अर्बुद ( गाठी ), हिवताप व सूक्ष्म-जंतू यांच्याविरुद्धची औषधिद्रव्ये ही या दोघांची काही आवडीची संशोधनाची कार्यक्षेत्रे आहेत. त्यांचे २०० पेक्षा अधिक संशोधनपर लेख विविध वैज्ञानिक व वैद्यकीय ज्ञानपत्रिकांतून प्रसिद्ध झाले आहेत. त्यांना अनेक देशी-विदेशी संस्था-संघटनांचे सदस्यत्व, सन्माननीय पदव्या, अनेक पुरस्कार, पदके व पारितोषिके हे सन्मान मिळाले आहेत. १९४५ पासून अर्धनिवृत्तीपर्यंत या दोघा अमेरिकन वैज्ञानिकांनी मुख्यत्वे बरोज वेलकम या मोठ्या, खाजगी औषध कंपनीत संशोधन केले आहे. मात्र एलियन यांच्याविषयी व्यक्तिगत माहिती विशेष उपलब्ध नाही. हिचिंग्जविषयीची व्यक्तिगत माहिती अशी आहे : हिचिंग्ज यांचा जन्म १८ एप्रिल १९०५ रोजी हॉक्वियन ( वॉशिंग्टन ) येथे आणि शिक्षण वॉशिंग्टन व हार्व्हर्ड विद्यापीठांत झाले. त्यांनी पीएच्. डी. ही पदवी मिळविली आहे. त्यांनी वरील दोन विद्यापीठांशिवाय वेस्टर्न रिझर्व्ह, ड्यूक, एन्. सी. चॅपल हिल व चुआंग–आंग ( सेऊल ) या विद्यापीठांतून अध्यापनाचे काम केले आहे. तसेच पाकिस्तान,

इराण, भारत, जपान, दक्षिण आफ्रिका इत्यादी देशांत व्याख्याने दिली आहेत. १९४२ साली ते वरील कंपनीत दाखल झाले व तेथे त्यांनी विविध पदांवर कामे केली. उदाहरणार्थ, १९६८ साली ते संचालक व १९७१ साली अध्यक्ष झाले. तर १९७५ पासून गुणश्री वैज्ञानिक व सल्लागार म्हणून ते तेथे काम करीत आहेत.

## शांतता

गेल्या वर्षी अमेरिकेचे अध्यक्ष रेगन आणि रशियाचे नेते गार्बोचेव्ह यांनी मध्यम पल्ल्याच्या क्षण्वस्त्रांवर बंदी घालण्याचा करार केला होता. त्या वेळेपासूनच या दोघांना १९८८ सालचे शांततेचे नोबेल पारितोषिक मिळेल अशी भाकिते करण्यात येऊ लागली होती व अधूनमधून तशा वावड्या उठत होत्याच. अशा तऱ्हेने या वर्षी या पारितोषिकासाठी एकूण ९७ व्यक्ती व संघटनांची नावे सुचविण्यात आलेली होती आणि हे दोघे महसत्ताधीश यांमध्ये आघाडीवर होते. त्यामुळेच या पारितोषिकाच्या घोषणेच्या सुमारास वॉशिंग्टनमध्ये ते वाट पाहात होते तशी बातमी येण्याची; तर मॉस्कोत प्रतीक्षा होती ओस्लोवरून येऊ घातलेल्या फोनची! अर्थात, ओस्लोतील नॉर्वेजियन नोबेल समितीला मात्र खरे काय ते माहीत होते. आणि प्रत्यक्षात हे पारितोषिक संयुक्त राष्ट्रांच्या जगभरच्या शांतता रक्षक दलांना देण्यात आले. अर्थात, या वर्षी या पाच जणांच्या समितीने २९ सप्टेंबरलाच म्हणजे सुमारे १५–२० दिवस आधीच पारितोषिकाची घोषणा करून वरील मंडळींचा प्रतीक्षेचा काळ कमी केला.

संयुक्त राष्ट्रांच्या शांतता रक्षक दलांचे निरीक्षक व हलकी हत्यारे बाळगणारे यात येतात. पारितोषिक जाहीर करताना नोबेल समितीने पश्चिम आशिया, सायप्रस व भारतीय उपखंड येथील निळ्या टोपीवाल्या तुकड्यांची स्तुती केली आहे. कारण त्यांनी त्या भागांत तात्पुरत्या तहांद्वारे शांतता आणून तणाव कमी केला आहे. म्हणून समिती म्हणते, "या ८६०० बहूद्देशीय सैन्यदलाला जेथे साक्षात शांतता करार अजून व्हायचे आहेत अशा प्रदेशांतील तणाव कमी करण्याचे प्रयत्न केल्याबद्दल हे पारितोषिक देण्यात येत आहे ........ पुष्कळदा अशा संघर्षांमागची मलभूत कारणे टिकून राहिली असली, तरी संघर्षाची तीव्रता कमी करण्याच्या कामी यांनी महत्त्वपूर्ण कामगिरी बजावली आहे."

ओस्लो येथे पारितोषिकाची घोषणा करताना या नोबेल समितीचे अध्यक्ष एगिल आर्व्हिक म्हणाले की, ही शांततारक्षक दले "वाटाघाटींद्वारे शांतता प्रस्थापित करण्याच्या संयुक्त राष्ट्रांच्या दुर्दम्य इच्छाशक्तीची प्रतीके असून शांतताविषयक प्रत्यक्ष बोलणी सुरू करण्याच्या निर्णयाच्या कामी तेथील या सैन्यदलाचा वाटा मोठा आहे."

संयुक्त राष्ट्रांचे सरचिटणीस पेरेझ द क्यूलर यांनी ओस्लो येथे येऊन प्रत्यक्ष पारितोषिक वितरण सोहळ्यात हे पारितोषिक स्वीकारावे, अशी अपेक्षाही आर्व्हिक यांनी व्यक्त केली होती. हा सोहळा आल्फ्रेड नोबेलच्या पुण्यतिथीच्या दिवशी म्हणजे १० डिसेंबरला होत असतो. पेरेझ द क्यूलर या दिवशी पारितोषिक स्वीकारण्यास जातीने हजर राहिले होते.

ही बातमी ऐकून क्यूलर म्हणाले– "नोबेल समितीने सर्व जगातील जनता व सर्व देश यांच्या शांततेच्या व्यापक शोधासाठीच्या प्रयत्नांना मान्यता दिली आहे." नोबेल समितीचा हा निर्णय म्हणजे संयुक्त राष्ट्रे, त्यांची विचारसरणी, उद्दिष्टे, तसेच सिद्धांत यांविषयीच्या आदराचे प्रतीक आहे, अशी प्रतिक्रिया अर्जेंटिनाच्या परराष्ट्रमंत्र्यांनी व्यक्त केली. तर फ्रान्सचे व अमेरिकेचे अध्यक्ष तसेच इतर देशांच्या प्रमुखांनी याबद्दल संयुक्त राष्ट्रांचे व शांतिसैनिकांचे अभिनंदन केले आहे. मध्यपूर्वेत तैनात केलेल्या शांतिसैनिकांनी ही आनंदाची बातमी युद्धग्रस्त जेरूसलममध्ये मद्यपानाने साजरी केली.

या पारितोषिकामुळे संयुक्त राष्ट्रांचे नीतिधैर्य वाढण्यास मदत होईल. कारण ही आंतरराष्ट्रीय संघटना आता परिणामकारक राहिली नसून तिची गरज उरलेली नाही, अशी टीका तिच्यावर विशेषकरून अमेरिकनांकडून होत असते. म्हणून आर्व्हिक यांना जेव्हा प्रश्न करण्यात आला होता की, या पारितोषिकाच्या घोषणेचा अमेरिकेतील अध्यक्षीय निवडणुकीच्या मोहिमेवर काही परिणाम पडला का? यावर आर्व्हिक उत्तरले "आम्ही प्रत्येक गोष्ट विचारात घेत असतो." जगात व्यापक प्रमाणावर शांतता आणू इच्छिणाऱ्या लोकांनी या पारितोषिकाचे स्वागत केले आहे आणि यामुळे संयुक्त राष्ट्रांचे कार्य अधिक व्यापक होईल, असे म्हटले आहे.





राष्ट्रांची अशा तऱ्हेची शांततारक्षक दले सर्वप्रथम १९४८ साली इस्राएल व अरब यांच्यात झालेल्या तहावर देखरेख ठेवण्यासाठी निरीक्षक मंडळाच्या रूपात धाडण्यात आली होती. आतापर्यंत या दलांनी संघर्षाच्या १४ ठिकाणी काही प्रमाणात शांतता राखण्यास मदत केलेली आहे. हल्ली नऊ देशांतून अशी दले पाठविण्यात आलेली असून पश्चिम आशियात अशी सर्वाधिक दले तैनात केलेली आहेत. अफगाण व इराक–इराण येथील संयुक्त राष्ट्रांच्या या दलांची कामगिरी बरीच यशस्वी ठरलेली आहे. आतापर्यंत या दलांतील ७०० पेक्षा अधिक सैनिकांना शांतता प्रस्थापित करताना वीरगती प्राप्त झाली आहे. दक्षिण लेबनॉनमध्येच १९७८ पासून २०० पेक्षा अधिक जण अशा तऱ्हेने बळी पडले आहेत. असे असले तरी या दलांमुळे संयुक्त राष्ट्रे या जागतिक संघटनेवरील विश्वास दृढ झाला आहे. तसेच यांच्यामुळे या संघटनेला जागतिक घटनांमध्ये वाढत्या प्रमाणात भाग घेणे शक्य झाले आहे.

या पारितोषिकामुळे या दलांना सुवर्णपदकाबरोबरच सुमारे ३ लाख ९७ हजार डॉलर एवढी रक्कम मिळाली आहे. या रकमेचे काय करणार हे स्पष्ट झालेले नाही. बहुधा ही रक्कम संयुक्त राष्ट्रांच्या शांतता प्रस्थापित करण्यासाठी आखण्यात येणाऱ्या अंदाजपत्रकात समाविष्ट करण्यात येईल, असे निरीक्षकांचे मत आहे.

**भौतिकी**

१९६०–७० या दशकाच्या प्रारंभी प्रयोगशाळेमध्ये न्यूट्रिनो नावाच्या मूलकणांची शलाका निर्माण करण्याची रीत शोधून काढल्याबद्दल तसेच तदनंतर म्यूऑन न्यूट्रिनो नावाने ओळखण्यात येणारा नवाच अज्ञात मूलकण शोधून काढल्याबद्दल या वर्षीचे भौतिकीचे नोबेल पारितोषिक अमेरिकेतील दोघा व स्वित्सर्लंडमधील एका भौतिकीविदांना विभागून देण्यात आले आहे. खरे म्हणजे या संशोधनासाठी या तिघांना अनेक वर्षांपूर्वीच हे पारितोषिक मिळायला हवे होते. त्यामुळेच 'नेचर' या साप्ताहिकाने या उशीराबद्दल म्हटले आहे, "उच्च ऊर्जा भौतिकीमधील संशोधनाची घोडदौड पाहता या वर्षीचे हे पारितोषिक 'प्रागैतिहासिक' काळातील मूलभूत संशोधनाला दिल्यासारखे भासते." तर एक पारितोषिकविजेते लेडरमान या बातमीनंतर उद्गारले, "मी इतका म्हातारा झालो आहे की, मृतसमुद्र केव्हा 'आजारी' पडला होता ते मला आठवते. हे वर्ष म्हाताऱ्यांना नोबेल पारितोषिक देण्याचे दिसते." या दोन्ही प्रतिक्रियांमध्ये तथ्य निश्चितच आहे. कारण या तिघांनी १९६२ सालीच न्यूट्रिनो पकडण्याची व अणूपेक्षा लहान मूलकणांचा (म्यूऑन न्यूट्रिनो) शोध घेण्यासाठी त्यांचा वापर करण्याची तंत्रे विकसित केली होती. अर्थात या संशोधनाचा या पारितोषिकासाठी या आधी बऱ्याचदा विचार झाला होता; पण अधिक नव्या संशोधनाला हे पारितोषिक मिळत गेले. त्यामुळे या तिघांची संधी हुकली, असेच सर्वांना वाटले होते. त्यामुळे उशीरा का होईना या संशोधनाची योग्यता अशा रीतीने मान्य झाल्याबद्दल या क्षेत्रातील तज्ज्ञांना आनंद झाला आहे !

चराचर सृष्टीचे सर्वांत छोटे किंवा पायाभूत घटक कोणते आहेत, हे जाणून घेण्याची माणसाची जिज्ञासा सनातन आहेच. याचे संशोधन दीर्घकाळापासून होत आलेले आहे. या शतकारंभी अणू हे असे घटक असल्याचे मानले जात होते कारण ते अविभाज्य म्हणजे तुकडे न होऊ शकणारे वाटले होते. पुढे अणू भंग पावू शकतो आणि न्यूट्रॉन, प्रोटॉन व इलेक्ट्रॉन हे त्याचे घटक असतात, हे लक्षात आले. त्यामुळे हे तीन मूलकण हे द्रव्याचे मूलभूत घटक मानण्यात येऊ लागले. आता प्रोटॉन हाही अन्य सूक्ष्मतर घटकांचा बनला असल्याचे प्रत्ययास आले आहे म्हणजे खरा अंतिम मूलकण कोणता हे कोडे अजून सुटलेले नाहीच. अर्थात, मूलकण शोधण्याची नवीन तंत्रे किंवा पद्धती शोधून काढल्याबद्दल या आधीच अनेकांना हे पारितोषिक मिळाल्याचे दिसून येईल.

या तिघांनी न्यूट्रिनो-शलाका अन्वेषणपद्धतीचा शोध लावला आहे. हे न्यूट्रिनो कसे असतात? सर्व तऱ्हेच्या किरणोत्सर्गी म्हणजे भेदक कण अथवा किरण बाहेर टाकणाऱ्या प्रक्रियांमध्ये हे मूलकण सर्वसाधारण असतात. या न्यूट्रिनो मूलकणाचे वस्तुमान जवळजवळ शून्य आहे आणि त्याच्यावर कोठलाही विद्युतभार नसतो. यामुळे या मूलकणाचे गुणधर्म अतिशय विलक्षण असतात व त्यांना 'भुतासारखे' गुणधर्म असे म्हणतात. कारण हे कण कशातूनही आरपार जाऊ शकतात. म्हणून वस्तुमान व विद्युतभार या परंपरागत बाबींवरून न्यूट्रिनोचे अस्तित्व ओळखता येणे अवघड असते. म्हणजे न्यूट्रिनो किरणोत्सर्गात असला, तरी तो नेमका

एखाद्या व्यक्तीऐवजी संस्थेला किंवा संघटनेला हे पारितोषिक मिळण्याची ही सोळावी वेळ आहे. संयुक्त ओळखून दाखविणे किंवा त्याचे अस्तित्व सिद्ध करणे हे महाकर्मकठीण काम आहे. म्हणून दीर्घकाळापासून त्याच्या अस्तित्वाविषयी केवळ अंदाज बांधण्यात येत होते. अशा तऱ्हेने याची अणूंशी वा मूलकणांशी क्रिया घडून येणे अवघड असते व अशी क्रिया घडून आलीच, तर तिचे प्रमाण अत्यल्पच असते. कारण न्यूट्रिनो हा मैलन्‌मैल लांबीच्या शिशाच्या पटलातून इतर अणूंशी टक्कर न होता पार जाऊ शकतो. लेडरमान यांच्या हिशोबानुसार घन पोलादातून १० कोटी मैल अंतर कापताना एक सुटा न्यूट्रिनो ओळखू येण्याची शक्यता पन्नास-पन्नास टक्केच असते.

विश्वामध्ये गुरुत्वीय, विद्युतचुंबकीय, प्रबल अणुकेंद्रीय व दुर्बल अणुकेंद्रीय ह्या चार मूलभूत प्रेरणा असल्याचे मानले जाते. यांपैकी किसणोत्सर्गी बीटा-क्षयाला कारणीभूत असणाऱ्या दुर्बल अणुकेंद्रीय प्रेरणेवर अणुकेंद्राच्या अंतरंगातील घटक कणांमधील आंतरक्रिया अवलंबून असतात. १९६०–१९७० दरम्यानच्या काळात केवळ याच प्रेरणेचा शोध घेण्याचे प्रयत्न चालू होते. तेव्हा अणुकेंद्रावर केवळ दुर्बल प्रेरणेचा प्रभाव पाडू शकणारी न्यूट्रिनो कणांची शलाका निर्मिण्याची कल्पना श्वार्ट्झ या या वर्षीच्या एका पारितोषिक विजेत्यांनी मांडली होती. मात्र अशा भुतासारख्या मूलकणांची शलाका कशी तयार करायची हे समजत नव्हते व त्यामुळे त्यांना कुचेष्टाही सहन करावी लागली होती. तथापि या तिघांनी त्याच वेळी कोलंबिया विद्यापीठात आपल्या संशोधनाची आखणी केली होती. नंतर त्यांनी लाँग आयलंड येथील ब्रुकहॅव्हन नॅशनल ॲक्सिलरेटर लॅबोरेटरीमधील कणवेगवर्धक ( म्हणजे विद्युतभारित कणांना प्रवेगित करून उच्च ऊर्जा देणाऱ्या ) साधनाचा वापर करून प्रोट्रॉनांची व वेगवान ( ऊर्जावान ) शलाका बेरिलियमच्या लक्ष्यावर टाकली. यामुळे प्रचंड आघात (टकरी) होऊन अणुकेंद्रांचा चक्काचूर झाला आणि न्यूट्रिनोंसह इतर घटककण इतस्ततः विखुरले गेले. प्रथम या घटककणांत पायॉन नावाचे कण विपुल होते. नंतरच्या उड्डाणात एका पायॉनाचा क्षय होऊन न्यूट्रिनो व एक विद्युतभारित मूलकण निर्माण झाला. याच्याएवढाच पुढील महत्त्वाचा टप्पा म्हणजे हे न्यूट्रिनो इतर कणांपासून अलग करणे हा होता. यासाठी त्यांनी युद्धनौकांच्या भंगारातून मिळालेल्या पोलादाची एक प्रचंड, अवजड भिंत उभारली होती. या सभोवतालच्या पोलादी भिंतीत न्यूट्रिनोशिवाय इतर कण शोषले गेले. अशा तऱ्हेने कोटचवधी न्यूट्रिनो या भिंतीच्या बाहेर पडले व या भिंतीमागील १० टनी ठिणगी कोठी या नावाने ओळखण्यात येणाऱ्या कण अभिज्ञातक साधनात गेले (हे साधन कण ओळखण्यासाठी असते व त्यासाठी ठिणग्यांची एक मालिका निर्माण होण्याची व्यवस्था यात केलेली असते). तेथे आलेल्या न्यूट्रिनोंच्या इतर अणूंशी टकरी होऊन द्वितीयक विद्युतभारित मूलकण निर्माण झाले व त्यामुळे न्यूट्रिनोंची ओळख पटली. अशा तऱ्हेने न्यूट्रिनोची शलाका (स्रोत) मिळून त्याद्वारे येथील अणुकेंद्रे व इतर मूलकण यांच्याविषयी नवी व उपयुक्त माहिती मिळाली. म्हणजे अणुकेंद्रापेक्षा लहान कणांच्या संशोधनात न्यूट्रिनोंचा एखाद्या हत्यारासारखा उपयोग करून घेता येऊ शकतो, हे तंत्र कळून आले.

या प्रयोगाचा एक अनपेक्षित असा लाभही झाला. एके दिवशी पहाटे तीन वाजता उठून लेडरमान हे या कोठीतील अणूंचे तुकडे अभ्यासत असताना त्यांना त्यात एका नव्याच मूलकणाच्या खुणा आढळल्या. हा प्रथमच आढळलेला नवीन मूलकण म्हणजे म्यूऑन न्यूट्रिनो (म्यूमेसॉन) हा होय. अशा प्रकारे न्यूट्रिनोचे दोन भिन्न प्रकार असतात, हे उघड झाले. त्या काळी बीटा-क्षयामध्ये इलेक्ट्रॉनाबरोबर निर्माण होणारा न्यूट्रिनोचा एकच प्रकार माहीत होता. तथापि या प्रयोगामध्ये कोठीत न्यूट्रिनोसह आढळणारा विद्युतभारित मूलकण हा बऱ्याचदा इलेक्ट्रॉन नसून म्यूऑन हा असल्याचे आढळले होते. याची खातरजमा करून घेण्यासाठी नंतर अनेक प्रयोग करण्यात आले. त्यांवरून पूर्वपरिचित इलेक्ट्रॉन न्यूट्रिनोहून म्यूऑन न्यूट्रिनो हा वेगळाच प्रकार असल्याचे नक्की झाले. आणि तेव्हापासून हे न्यूट्रिनोचे दोन्ही प्रकार, क्वार्क आणि त्यांच्याशी निगडित असणारे विद्युतभारित मूलकण हे तीन समांतर पण भिन्न प्रकारांत (कुलांत) विभागण्यात आले आहेत.

हे पारितोषिक देणाऱ्या रॉयल स्विडीश अकादमी ऑफ सायन्सेसचा या संशोधनाविषयीचा अभिप्राय असा आहे: "या तिघांच्या संशोधनामुळे पूर्णतया नवीन द्रव्याच्या सर्वांत आतील रचना व गतिकीविषयीच्या भावी संशोधनाच्या दृष्टीने सुसंधी निर्माण


अनुक्रमणिका

झाल्या आहेत...... इतर गोष्टींबरोबरच यामुळे भुता-सारख्या न्यूट्रिनोंचा संशोधनाचे एक साधन म्हणून उपयोग करून घेण्याचा शोध लागला...... न्यूट्रिनो शलाका अन्वेषण पद्धती व म्यूऑन न्यूट्रिनो यांच्या शोधामुळे लेप्टॉन या मूलकणाची द्विक (डबलेट) रचना म्हणजे प्रोटॉनपेक्षा किंचित कमी (वेगळे) वस्तुमान असल्याची वस्तुस्थिती उघड झाली....... निसर्गातील चार मूलभूत प्रेरणांपैकी दुर्बल अणुकेंद्रीय प्रेरणा या एका प्रेरणेविषयी भावी काळात होणाऱ्या संशोधनाच्या मार्गातील दोन मोठे अडथळे या संशोधनामुळे दूर झाले आहेत".

या वर्षाच्या भौतिकीच्या नोबेल पारितोषिकाच्या मानकऱ्यांची माहिती थोडक्यात पुढे दिली आहे : मेल्व्हीन श्वार्त्झ (५५) हे पूर्वी कोलंबिया व स्टॅनफर्ड या विद्यापीठांत भौतिकीचे प्राध्यापक होते. हल्ली ते अमेरिकेत माऊंट व्ह्यू (कॅलिफोर्निया) येथे असतात व त्यांनी स्वतःची संगणक-संदेशवहनविषयक कंपनी काढली आहे.

जॅक स्टाइनबर्गर या दुसऱ्या विजेत्यांचा जन्म २५ मे १९२१ रोजी जर्मनीत झाला. त्यांचे शिक्षण शिकागो विद्यापीठात झाले असून त्यांनी पीएच्. डी. पदवी संपादन केली आहे. त्यांनी प्रिन्स्टन, कॅलिफोर्निया व कोलंबिया विद्यापीठांत अध्यापनाचे काम केले असून सध्या ते जिनिव्हाजवळील सर्नच्या (CERN) म्हणजे यूरोपीय न्यूक्लिअर रिसर्च सेंटरच्या प्रयोग-शाळेत असतात. भौतिकीतील प्रयोग करण्याच्या बाबतीत त्यांची विशेष ख्याती आहे. या सौम्य स्वभा-वाच्या आणि गिर्यारोहण, बासरी वाजविणे हे छंद असणाऱ्या भौतिकीविदांचे जोन ब्यूरगार्ड (१९४३) व सिंथिया ईव्ह् आल्वा (१९६१) यांच्याशी विवाह झाले असून त्यांना तीन मुलगे व एक मुलगी आहे. त्यांच्या पुढील पुस्तकांवरून त्यांच्या विपुल संशोधनाची कल्पना येऊ शकेल: 'म्यूऑन डीके' (१९४९), 'पि आय (Pi) झीरो मेसॉन' (१९५०), 'स्पिन ऑफ पायॉन' (१९५१), 'पॅरिटी ऑफ पायॉन' (१९५४, १९५९), 'झेड झीरो($z^{\circ}$) हायपेरॉन' (१९५७), 'प्रॉपर्टीज ऑफ "स्ट्रेंज पार्टिकल्स"(१९५७–६४), 'टू न्यूट्रिनोज' (१९६२), 'सी पी व्हायोलेटिंग इफेक्टस इन न्यूट्रिनो केझीरो ($K^{\circ}$) डीके' (१९६६–१९७४), 'हाय एनर्जी न्यूट्रिनो फिजिक्स' (१९७५–१९८३), 'प्रेपरेशन ऑफ लेप डिटेक्टर' (१९८१).

लेऑन एम्. लेडरमान हे तिसरे विजेते असून त्यांचा जन्म १५ जुलै १९२२ रोजी न्यूयॉर्क येथे झाला. सिटी कॉलेज (न्यूयॉर्क) व कोलंबिया विद्यापीठांत त्यांचे शिक्षण झाले असून त्यांनी बीएस्., एएम्. व पीएच्. डी या पदव्या मिळविल्या आहेत. कोलंबिया विद्यापीठात भौतिकीचे प्राध्यापक म्हणून (१९५८–६०) व न्यूयॉर्कच्या नेव्हिस प्रयोगशाळेचे संचालक (१९६०–६७) म्हणून त्यांनी काम केले असून १९७९ पासून ते शिकागोजवळच्या बटाव्हिया (इलिनॉय) येथील ब्रुक-हॅव्हन (फेर्मी) नॅशनल लॅबोरेटरीचे संचालक आहेत. १९७१ साली 'सर्न' मध्ये वरिष्ठ अभ्यागत वैज्ञानिक म्हणून त्यांनी काम केले होते. 'कॉमेंट्स ऑन न्युक्लिअर अँड पार्टिकल फिजिक्स' या नियतकालिकाचे ते संपादक होते (१९७२). त्यांनी १०० पेक्षा जास्त शोधनिबंध लिहिले असून फेलोशिप्स, सन्माननीय सदस्यत्व, पदके वगैरे सन्मान त्यांना मिळाले आहेत. फ्लॉरेन्स गार्डन यांच्याशी १९४५ साली त्यांचा विवाह झाला असून त्यांना एक मुलगा व एक मुलगी अशीअपत्ये आहेत.

लेडरमान अजूनही उच्च ऊर्जा भौतिकी या विष-यातील संशोधनाचे काम करीत आहेत. अतिसंवाहक महा-आघातकारी साधन (सुपरकंडक्टिंग सुपरकोला-यडर) या ५० मैल परीघ असलेल्या प्रोटॉन-प्रोटॉन यांच्यात आघात घडवून आणणाऱ्या अमेरिकेत उभा-रल्या जाणाऱ्या साधनाच्या उभारणीला त्यांचा पाठिंबा आहे. उन्हाळी अभ्यासक्रमाच्या वेळी माध्यमिक शाळे-तील विद्यार्थ्यांना आपल्या प्रयोगशाळेत प्रत्यक्ष घेऊन जाण्याचा उपक्रम त्यांनी यशस्वीपणे पार पाडला होता.

आपल्याला हे पारितोषिक मिळाल्याचे समजल्यावर प्रथम ते काहीसे चकितच झाले व पुटपुटले होते, "नोबेल पारितोषिकाविषयी कोठली तरी अनामिक आदरयुक्त भीती वाटते. (कारण) ज्यांच्याविषयी आम्हाला आदर आहे अशा आइन्स्टाइन, फेर्मी यांच्या-सारख्यांना ते याआधी मिळाले असल्याने या पारि-तोषिकाभोवती एक प्रकारचे वलय निर्माण झालेले आहे".












# वाद्-संवाद्

संपादक ' नवभारत ' यांस–

ऑगस्ट १९८८ च्या ' नवभारत ' मध्ये प्रा. व. वि. अकोलकरांचा 'मनाचे प्रभावकत्व' या मथळ्याचा एक लेख प्रसिद्ध झाला आहे. त्यातील काही मुद्द्यां-विषयी लिहिणे अगत्याचे आहे असे वाटल्यावरून हे पत्र लिहीत आहे.

१) प्रा. अकोलकरांनी नेल्या मिखाइलोवा आणि निना कुलजिना या दोन वेगळ्या स्त्रिया आहेत असे समजून त्यांच्या मनःसामर्थ्याची उदाहरणे दोन वेगळ्या नावांखाली दिली आहेत. पण वस्तुतः या दोन भिन्न व्यक्ती नसून एकच व्यक्ती आहे. मिखाइलोवा हे निना कुलजिनाला रशियन शास्त्रज्ञांनी दिलेले टोपणनाव आहे. अकोलकरांना त्या दोन भिन्न स्त्रिया वाटल्या याचे कारण बहुधा निनाविषयीची माहिती त्यांनी दोन भिन्न स्रोतांपासून ( भिन्न नावांखाली ) मिळवली हे असावे. पण तरीही एका गोष्टीचा उलगडा होत नाही. अकोलकरांनी मिखाइलोवा "ही रशियन स्त्री रशियन राज्यक्रांतीच्या वेळी सैन्यात दाखल झाली होती ", असे विधान केले आहे. हे विधान त्यांनी कशाच्या आधारे केले आहे हे कळत नाही. कारण मिखाइलोवा (निना) ही रशियन राज्यक्रांतीच्या वेळी जन्मलीसुद्धा नव्हती. ती सैन्यात दाखल झाली होती हे खरे आहे; पण ते दुसऱ्या महायुद्धाच्या वेळी– १९४१ साली. म्हणजे रशियन राज्यक्रांतीनंतर तब्बल २४ वर्षांनी.

२) यूरी गेलरवर तो जादूगार असल्याचा आरोप करण्यात आला असला, तरी तो आरोप त्याला स्वतःला मान्य नव्हता. जे. पी. गिरार्ड यांची मात्र गोष्ट वेगळी आहे. तो जादूगार तर होताच, पण आपण जादूगार असल्याचे त्याने स्वतःही मान्य केले आहे. ( किंबहुना आपल्यावर प्रयोग करणाऱ्या शास्त्रज्ञांना तसा इशाराही त्याने दिला आहे ! ) या गोष्टीचा अकोलकरांनी उल्लेख करावयास हरकत नव्हती; की ही गोष्ट त्यांना माहीत नाही ? (अतींद्रिय प्रकारात अशा गोष्टींचा उल्लेख संशयनिरसनासाठी आवश्यक असतो.)

३) मनःसामर्थ्याची अकोलकरांनी दिलेली उदाहरणे ही ग्रंथांतर्गत व तज्ज्ञांसाठी असलेल्या नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेली (व म्हणून शास्त्रीय कसोटीस उतरलेल्या व्यक्तींची ) आहेत. अशा उदाहरणांच्या जोडीला वृत्तपत्रात प्रसिद्ध झालेली एका लहान मुलीविषयीची छोटी बातमी त्यांनी का द्यावी हे कळत नाही. (जोअन्ना जी. या १३ वर्षांच्या मुलीचे त्यांनी दिलेले उदाहरण म्हणजे Kurier Polski या पोलिश वृत्तपत्राचा हवाला देऊन इंडियन एक्सप्रेसने आपल्या २५ मे १९८३ च्या अंकात प्रसिद्ध केलेली AFP ची एक छोटी बातमी आहे. Kurier ऐवजी Kurler पडले आहे.)*

४) "आपल्यावर कोणी करणी करीत आहे अशा कल्पनेची मनावर पकड असलेल्या व्यक्तीच्या अंगावर फुल्या वगैरे उमटतात" असे अकोलकरांनी विधान केले असून अशा कल्पनेची मनावर पकड नसेल तर त्या उमटणार नाहीत असे त्यातून सूचित होते. पण बहुतेक उदाहरणांत अशा फुल्या वगैरे उमटल्यानंतरच तो करणीचा प्रकार असावा असे ध्यानात येते. ही वस्तुस्थिती आहे. (माझ्याकडे अशा उदाहरणांच्या नोंदी आहेत.)

५) ज्या अतींद्रिय प्रकाराला अकोलकरांनी "मनाचे प्रभावकत्व" असे नाव दिले आहे त्याला इंग्रजीत Psychokinesis म्हणतात. याचे भाषांतर "**मनश्चलनशक्ती**" असे करणे योग्य होईल. कारण Kinesis या शब्दाचा अर्थ 'चलनवलन' असा असून शक्तीच्या Heat energy (उष्णता शक्ती), Electric energy ( विद्युच्छक्ती ), व Kinetic energy (चलन शक्ती) या तीन प्रकारांपैकी ती एक शक्ती असून मनाच्या अभौतिक (अतींद्रिय) शक्तीचे Kinetic या भौत (इंद्रियगम्य) शक्तीमध्ये रूपांतर होऊ शकते असे या शब्दप्रयोगाने सूचित करायचे असते. (हे प्रकार ज्ञात–विज्ञानात बसत नाहीत म्हणून त्यांना पराभौतिक, परासामान्य–Paranormal – अतींद्रिय

* वृत्तपत्रातील बातमी खोटी असते असे अर्थातच येथे सुचवायचे नाही.






म्हणावे लागते.) उलट, मनाचे प्रभावकत्व हा शब्द-प्रयोग हे प्रकार ज्ञात नियमात बसू शकतात असे सूचित करतो. कारण मनाची शक्ती राग, द्वेष इत्यादींमधून प्रकट होऊ शकते व त्याचा इतरांवर प्रभाव पडू शकतो. मन:प्रभाव हा शब्द नेहमीच्या व्यवहारातील शब्द असून त्याचा अर्थ सर्वज्ञात आहे. पण या अर्थाने अकोलकरांना तो शब्द वापरायचा नाही हे उघड आहे. म्हणून तो टाळणेच युक्त होय.

६) अनेक व्यक्तींनी मनश्चलनशक्तीने रोग बरे केल्याची उदाहरणे असताना व अतींद्रिय शक्तीला व्यावहारिक दृष्टचा याच क्षेत्रात खरे महत्त्व असताना अकोलकरांनी या क्षेत्रातील उदाहरणे देणे कटाक्षाने टाळावे याचे आश्चर्य वाटते. (सायकोकायनेसिसच्या प्रकारात हेही प्रकार मोडतात.) बरे, 'चलनवलना'-पुरताच त्यांचा लेख मर्यादित आहे असे म्हणावे, तर शास्त्रज्ञांच्या कसोटीला उतरलेल्या होम, पॅलाडिनो, स्नायडर इ. माध्यमांच्या उपस्थितीत घडलेल्या चलन-वलनांच्या (भानामतीसदृश) प्रकारांचा त्यांनी उल्लेख का टाळला आहे बरे ? लेखविस्तार टाळायचा असेल तर निदान यांचा जाताजाता उल्लेख करणे आवश्यक होते. (हेही प्रकार सायकोकायनेसिसमध्ये मोडतात.)

'अवा विनोग्रॅदोवा' ऐवजी 'आल्ला विनोग्रॅडोवा' (ठळक अक्षरे) पाहिजे होते. पातंजल-योगसूत्रातील 'एकतानता' या शब्दाऐवजी 'एकता तता' पडले आहे. हे अर्थात मुद्रणदोष असणे शक्य आहे.

केवळ दोषदिग्दर्शनासाठी हे पत्र लिहिलेले नसून शास्त्रीय दृष्टचा लेख निर्दोष राहावा म्हणून ते लिहिले आहे हे (अकोलकरांच्याबद्दल आदर असलेल्या माझ्या-सारख्याने) सांगणे नकोच.

—अद्वयानंद गळतगे












# सार-संकलन

## पाकिस्तानातील निवडणुका—निवडणुकांपूर्वीचे दृश्य

१६ नोव्हेंबर रोजी अनपेक्षित सुरळीतपणे पार पडलेल्या पाकिस्तानातील निवडणुकांचे रूप त्रयस्थ निरीक्षकांना कसे दिसले ?

सभांसाठी जमणाऱ्या जमावांच्या डोक्यांवरून झाडण्यात येणाऱ्या गोळीबारांच्या फैरींचे निनाद हे प्रचाराच्या धुमाळीचे पार्श्वसंगीत होते. इस्लामी लोकशाही आघाडीच्या स्वयंसेवकांचा हा गोळीबार करण्यात साधारणपणे पुढाकार होता. मुस्लिम लीग हा राजकीय पक्ष आणि भुट्टो कुटुंबाचे ह्या ना त्या कारणाने बनलेले शत्रू ह्यांची मिळून ही आघाडी उभी राहिली आहे. परलोकवासी राष्ट्राध्यक्ष झिया यांनी मुस्लिम लीगला सत्तेवर आणले होते. ज्यांच्या डोक्यांवरून गोळ्या झाडल्या जात होत्या ते प्रामुख्याने पाकिस्तान लोकपक्षाचे (पाकिस्तान पीपल्स पार्टी) पाठीराखे असत. परलोकवासी भुट्टो यांचा राजकीय वारसा म्हणून त्यांच्या पत्नी नुसरत बेगम आणि कन्या बेनझीर ह्या पक्षाचे नेतृत्व करतात. आपण एक प्रतिष्ठित राजकीय पक्ष आहोत आणि जबाबदारीने सरकार चालवू शकू हे प्रस्थापित सत्ताधाऱ्यांसमोर सिद्ध करण्याचा त्यांचा आटापिटा आहे. म्हणून त्यांचे अनुयायी मारामाऱ्यांत गुंतणे प्रयत्नपूर्वक टाळतात.

राष्ट्रापुढे असलेल्या प्रश्नांविषयीचे आपले धोरण काय आहे ह्यासंबंधीच्या विवेचनाचे गालबोट प्रचारात होणाऱ्या भाषणांना कधी लागले नाही. एकमेकांची वैयक्तिक उणीदुणी काढण्यावर सारा भर असे.

शर्यत अटीतटीची होणार असा रंग दिसत होता. पण प्रश्न असा पडतो, की ह्या दोन प्रतिस्पर्ध्यांत नेमका भेद काय आहे ? झुल्फिकार भुट्टो ह्यांनी लोकांना आकर्षून घेण्यासाठी डाव्या समाजवादी इ. विचारसरणींचा पुरस्कार केला होता. बेनझीर भुट्टो ह्यांनी तिला सोडचिठ्ठी दिली आहे. दोन्ही पक्षांवर जमीनदार कुटुंबांचे वर्चस्व आहे. काही कुटुंबे अशी आहेत की त्यांचे प्रतिनिधी दोन्ही पक्षांत आहेत. झियांनी जे आर्थिक धोरण स्वीकारले होते ते नियंत्रणमुक्त अर्थव्यवस्थेचे होते. दोन्ही पक्षांनी ह्या धोरणाला पाठिंबा दिला आहे. रशियाच्या अफगाणिस्तानातील, आता मावळत चाललेल्या उपस्थितीला, दोन्ही पक्ष कडाडून विरोध करतात. मग भेद कुठे आहे ? एक भेद असा की, पाकिस्तान लोकपक्षाचे पुरस्कर्ते पश्चिमी, आधुनिक, निधर्मी संस्कृतीकडे झुकलेले आहेत. इस्लामी लोकशाही आघाडीचा झियांच्या इस्लामीकरणाच्या धोरणाला पाठिंबा आहे. जमाते इस्लामी हा तिच्यातील एक घटक आहे. हा लहान पण शिस्तबद्ध गट मूलभूततावादी आहे. आघाडीला सत्ता मिळाली तर अधिक इस्लामी वळणाच्या कायद्यांचा आग्रह तो धरील.

ह्या धर्मनिष्ठतेचा काही राजकीय लाभ आघाडीला मिळतो ह्यात शंका नाही. पाकिस्तानी संघराज्याचे एक शरिया (इस्लामी कायदा) न्यायालय आहे, निवडणुकीत उमेदवार म्हणून ज्या व्यक्तीला उभे राहायचे असेल तिची परीक्षा घेण्यात येऊन तिला इस्लामचे पुरेसे ज्ञान आहे आणि ती इस्लामी धर्माचे आचरण करते हे सिद्ध करण्यात आले पाहिजे असा निर्णय ह्या न्यायालयाने द्यावा अशी तीन सनातनी वर्तमानपत्रांच्या संपादकांनी त्याच्यापुढे याचिका सादर केली. सुमारे ५० प्रसिद्ध राजकीय पुढाऱ्यांनी गैर-इस्लामी वर्तन केल्याचा पुरावा आपल्याकडे आहे असे त्यांचे म्हणणे होते. पण ह्यातून काही निष्पन्न झाले नाही. तथापि बेगम नुसरत भुट्टो खांदे अनावृत्त राखणाऱ्या पेहरावात अमेरिकन राष्ट्राध्यक्ष गेराल्ड फोर्ड ह्यांच्यासमवेत नृत्य करीत आहेत असे छायाचित्र आघाडीच्या फलकांवर झळकताना दिसत होते.

मतदारांनी ओळखपत्रे जवळ बाळगली पाहिजेत ह्या नियमाविरुद्ध लोकपक्षाने केलेली याचिका लाहोर उच्च न्यायालयाने उचलून धरली. पण पुढे सर्वोच्च न्यायालयाने ती फेटाळली. प्रतिस्पर्धी पक्षाला अनुकूल ठरेल अशा पद्धतीने ओळखपत्रे सरकारकडून वाटण्यात येतात असे लोकपक्षाचे म्हणणे आहे. ह्या प्रकरणातून गोंधळ आणि कटकटी निर्माण होतील असे अनेकांचे






भाकित होते. हंगामी राष्ट्राध्यक्ष गुलाम इशाक खान ह्यांचा ओळखपत्रांच्या योजनेला पाठिंबा होता. ह्यावरून आपले वैयक्तिक भवितव्य सुरक्षित करण्यासाठी ही खेळी ते खेळत आहेत असा लोकपक्षाचा तर्क आहे. कारण निवडणुकांनंतर जी राष्ट्रीय आणि प्रांतिक विधानमंडळे स्थापन होतील त्यांनी त्यांना निवडून दिले नाही तर आपले पद त्यांना सोडावे लागेल.

निवडणुकांत जर कोणत्याही पक्षाला स्पष्ट बहुमत मिळाले नाही तर पंतप्रधान निवडण्याचा अधिकार राष्ट्राध्यक्षाला आहे. अशा पंतप्रधानाला साठ दिवसांच्या अवधीत संसदेत आपले बहुमत प्रस्थापित करावे लागेल. पण एका निरीक्षकाने म्हटल्याप्रमाणे पंतप्रधान जी खैरत करू शकतो ती ध्यानी घेतली तर ह्या स्थानावर एखादा उंट असला तरी दोन महिन्यांत ही गोष्ट तो साधून दाखवील.

गुलाम इशाक खान हे झियांच्या जवळ असलेले सनदी अधिकारी होते. तेव्हा इस्लामी लोकशाही आघाडीला सत्ता लाभावी आणि मग तिने आपल्याला राष्ट्राध्यक्ष म्हणून निवडून द्यावे असा त्यांचा प्रयत्न असणार असा लोकपक्षाचा संशय आहे. तेव्हा संसदेने प्रथम राष्ट्राध्यक्षाला निवडून द्यावे आणि मग त्याने पंतप्रधानाची नेमणूक करावी अशी भूमिका लोकपक्षाने घेतली आहे. पण त्याबरोबर गुलाम इशाक खान ह्यांचा अनुनय करण्याचाही त्याचा प्रयत्न आहे. ही काहीशी विचित्र गोष्ट आहे. कारण १९७७ मध्ये जेव्हा झियांनी कारस्थान करून झुल्फिकार भुट्टो यांना पदच्युत केले तेव्हा इशाक खान हे संरक्षण खात्यात उच्च अधिकारी होते आणि त्यांचा ह्या कारवाईला पाठिंबा होता. आणि तरीही लोकपक्ष त्यांना राष्ट्राध्यक्ष म्हणून स्वीकारायला तयार आहे.

## निवडणुकांनंतर

पाकिस्तान लोकपक्ष विजयी ठरला; पण त्याला संसदेत निर्णायक बहुमत मिळाले नाही. लोकपक्षाचे नेतृत्व जरी बेनझीर भुट्टो आणि नुसरत भुट्टो ह्या दोन स्त्रियांनी केले तरी हा विजय एका पुरुषाचा आहे. झुल्फिकार अली भुट्टो यांचा. अकरा वर्षांपूर्वी त्यांना पदच्युत करण्यात आले होते आणि नऊ वर्षांपूर्वी त्यांना फाशी देण्यात आले होते. पण लोकांवर त्यांची मोहिनी होती. 'भुट्टो यांनी गरिबांसाठी चांगल्या गोष्टी केल्या होत्या.' निदान गरीब लोक तरी असे मानीत होते आणि गरीब पाकिस्तानी जनतेने आपले ऋण ह्या निवडणुकीत फेडले.

जनतेने इस्लामी लोकशाही आघाडीच्या बड्या पुढाऱ्यांना हात दाखविला. महंमद खान जुनेजो, झियांनी नेमलेले व नंतर पदभ्रष्ट केलेले पंतप्रधान, पडले. त्यांचे पाठीराखे, पगाराचे पीर, हेही पडले. हे पीर म्हणजे सिंध प्रांतातील सर्वांत बडे धेंड आहे असे मानले जाते. ते वंशपरंपरेने एक धार्मिक पंथाचे प्रमुख आहेत व म्हणून लोकांची श्रद्धा त्यांच्यावर आहे. त्यांचे एक खाजगी सैन्यही आहे. आघाडीला बहुमत मिळाले असते तर आपण पंतप्रधान होऊ अशी अपेक्षा बाळगणारे गुलाम नुस्तफा जाटो हेही पडले.

गरिबांप्रमाणे स्त्रियांनीही आपली मते लोकपक्षाला दिली असणार हे उघड आहे. लोकपक्षाचे नेतृत्व दोन स्त्रिया करतात हे पाहून एऱ्हवीपेक्षा अधिक स्त्रिया मतदानासाठी बाहेर पडल्या असणार. शिवाय लोकपक्षाचे एकंदर निधार्मिक वळण स्त्रियांना पसंत आहे. झिया राजवटीत बाईने न्यायालयात दिलेल्या साक्षीचे मूल्य पुरुषाच्या साक्षीच्या मूल्याच्या निम्मे होते आणि बायकांनी घरात बंदिस्त राहावे असे धोरण होते. आघाडीने भुट्टो मायलेकींच्या लैंगिक जीवनाविषयी जो प्रचार केला तोही तिच्या अंगलट आला. पाकिस्तानी जनतेला आपल्या स्त्रियांच्या शीलाविषयी अभिमान आहे आणि दोन खानदानी स्त्रियांवर ह्या स्वरूपाचा करण्यात आलेला हल्ला त्यांना पसंत पडला नाही. आघाडीतील सर्वांत कडवा धार्मिक गट जो जमाते इस्लामी त्याचा धुव्वा उडाला. १९८५ मध्ये त्याला प्रांतिक विधानसभात ११ जागा मिळाल्या होत्या. ह्या वेळी एक मिळाली.

पाकिस्तानचे सैन्य प्रामुख्याने पंजाबी आहे. ते राजवटीत असलेल्या सत्तेविरुद्ध सिंधी जनतेत रोष आहे. म्हणून झियांच्या राजवटीत अनेक प्रादेशिक सिंधी पक्ष उदयाला आले होते. पण ह्या वेळी सिंधी ग्रामीण भागांतील सर्व जागा लोकपक्षाने काबीज केल्या. आघाडीला सरहद्द प्रांत आणि बलुचिस्तान येथे मूठभर जागा मिळाल्या आणि सिंधमध्ये एकही जागा मिळाली नाही. पण पंजाबमध्ये तिला बहुमत मिळाले. पंजाबी पक्ष हे तिचे प्रादेशिक रूप स्पष्ट झाले.

तिसऱ्या क्रमांकाचा पक्ष म्हणजे गेल्या दोन वर्षांत उदयाला आलेला 'मोहजीर कौमी आंदोलन'.








१९४७-४८ मध्ये भारतातून ज्या मुसलमानांनी स्थलांतर केले त्यांचे हा पक्ष प्रतिनिधित्व करतो. आपल्या नवीन देशाच्या उभारणीत आपण जी मोलाची कामगिरी बजावली तिची कदर स्थानिक लोकांनी केली नाही असे त्यांचे गाऱ्हाणे आहे. ह्या पक्षाला जेवढ्या जागा मिळाल्या आहेत त्यांचा वापर राजकीय सौद्यासाठी करून मोहजीर लोकांचे हक्क त्यांना पदरात पाडून घेता येतील.

निवडणुकीचा एक परिणाम असा की, पाकिस्तानी राजकारण्यांचे सरासरी वय खूपच कमी झाले आहे. बेनझीर भुट्टो ह्या तिशीतल्या आहेत. मोजहीर कौमी आंदोलनाचे नेते अल्ताफ हुसेन ह्यांचेही वय एवढेच आहे. आघाडीचे वयस्क नेते पराभूत झाल्यामुळे तिची धुरा ४२ वर्षांचे नवाझ शरीफ ह्यांना सांभाळावी लागत आहे.

## आग्नेय आशियात भारताची भूमिका

मालदीव बेटात राज्यक्रांती घडवून आणण्याचा डाव भारताने त्वरित लष्करी कारवाई करून हाणून पाडला.

३ नोव्हेंबरला सकाळी ८-३० वाजता मालदीवचे अध्यक्ष मामून अब्दुल गयूम ह्यांच्या तैनातीतील एका अधिकाऱ्याचा फोन भारताच्या पंतप्रधानांना आला. त्याने ह्या प्रयत्नाची माहिती पंतप्रधानांना दिली. १५० छत्रिसैनिकांना घेऊन गेलेले वाहतूक विमान ह्यानंतर १४ तासांच्या आत मालदीव येथे उतरले. दिल्लीच्या दक्षिणेहून कुठूनतरी निघालेल्या ह्या विमानाला १७०० मैलांचे अंतर ह्यासाठी कापावे लागले. भारताच्या लष्करी सिद्धतेचा प्रत्यय सर्वांना आला.

ह्या प्रकरणात अमेरिका राजीव गांधी ह्यांच्याशी संपर्क राखून होती. भारताने केलेल्या कारवाईबद्दल तिने समाधान व्यक्त केले. रशिया आणि ब्रिटन ह्यांनी अशाच भावना व्यक्त केल्या. (ब्रिटनचे आधिपत्य होते तेव्हा मालदीवमधील एका बेटावर त्याचा एक विमान-तळ होता.) रीगन, गोर्बाचेव्ह आणि श्रीमती थॅचर एकमुखाने आपले अभिनंदन करीत आहेत हा अनुभव राजीव गांधी यांना आल्हाददायक ठरला असणार. कारण श्रीलंकेतील कारवाईबद्दल त्यांना बऱ्याच कटू गोष्टी ऐकून घ्याव्या लागत आहेत.

श्रीलंकेहून वेगळे राज्य मागणारी चळवळ त्या देशातील तामीळांच्या एका विभागाने १९८३ मध्ये सुरू केली. तामीळ बहुसंख्याक असलेल्या प्रदेशाला बऱ्याच प्रमाणात स्वायत्तता देण्यात यावी हा ह्या समस्येवरील तोडगा भारताला पसंत होता. भारतातील ५.५ कोटी तामीळ जनांच्या भावना ह्या प्रश्नात गुंतल्या होत्या हे भारताने ह्या समस्येत रस घ्यावा ह्याचे एक प्रमुख कारण आहे. अशी प्रादेशिक स्वायत्तता श्रीलंकेच्या शासनाने भरीव प्रमाणात देऊ केली आणि ह्या धोरणाचा पाठपुरावा करून श्रीलंकेत शांतता प्रस्थापित करण्याच्या उद्दिष्टाने भारतीय सैन्य त्या देशात पाठविण्यात आले. 'तामीळ वाघां'नी जेव्हा हा समझोता झिडकारून बंडखोरी चालू ठेवली तेव्हा भारतीय सैन्याला त्यांच्याशी लढण्याशिवाय गत्यंतर नव्हते. शांतता टिकवून धरण्यासाठी गेलेल्या ह्या सैन्याला तामिळी गनिमांना ठार मारावे लागत आहे आणि अनेक सैनिकांना प्राण अर्पण करावे लागत आहेत. तुलनेने मालदीव येथील कारवाई झटपट आटपली.

मालदीव येथे जे सत्तांतर घडवून आणण्याचा अयशस्वी प्रयत्न झाला ते घडून आले असते तर त्याने भारताच्या सुरक्षिततेला धोका निर्माण झाला असता असे नाही. पण भारताचे म्हणणे असे आहे की, त्याला आग्नेय आशियात स्थैर्य नांदायला हवे आणि कट-कारस्थानाने सत्तांतर घडवून आणण्याच्या प्रयत्नांनी अस्थिरता निर्माण होते. जगाच्या ह्या विभागात सुस्थिरता राखण्याची जबाबदारी भारताने आपण-होऊन स्वीकारली आहे असे दिसते आणि ती पार पाडण्याची धमक आपल्यात आहे ह्याचा प्रत्यय त्यांने मालदीव कारवाईच्या निमित्ताने सर्वांना दिला.

ह्या संदर्भात भारताने १९७१ साली त्या वेळच्या पूर्व पाकिस्तान ह्या आपल्या शेजारच्या प्रदेशात जी लष्करी कारवाई केली तिची आठवण अनेकांना होईल. त्या वेळी पाकिस्तानचा पश्चिम भाग आणि पूर्व भाग यांच्यात यादवी युद्ध सुरू झाले होते. ९० लाख पूर्व पाकिस्तानी नागरिकांनी भीतीने भारताचा आसरा घेतला होता. ते प्रामुख्याने पश्चिम बंगालमध्ये आले होते. ह्या सर्वांना अन्न आणि इतर आवश्यक वस्तू यांचा पुरवठा करीत राहाणे अशक्यप्राय होते. अस्थैर्य निर्माण होईल अशी ही परिस्थिती होती.

भारताने त्या वेळीही लष्करी कारवाई केली. भारतीय सैन्य पूर्व पाकिस्तानात गेले. यादवी युद्ध संपुष्टात आले. स्वतंत्र बांगला देशाचा जन्म झाला.






पाकिस्तानाला नेहमीच भारताविषयी संशय वाटत आलेला आहे. भारतविरोधी भावनाही पाकिस्तानात प्रबळ आहे. पण विशेषतः त्या वेळी भारताने जी कृती केली तिच्याबद्दल पाकिस्तानने भारताला कधीही क्षमा केलेली नाही. आपला संरक्षक असलेला वडीलधारा देश म्हणून मालदीव भारताचा स्वीकार करील. श्रीलंका आणि बांगला देश ह्यांना भारताचे सामर्थ्य मान्य करण्याशिवाय गत्यंतर नसेल. पण आग्नेय आशियाच्या परिसरात भारताचे प्राधान्य खरोखर प्रस्थापित व्हायचे असेल तर पाकिस्तानने ही वस्तुस्थिती म्हणून मनापासून स्वीकारली पाहिजे. हे घडवून आणण्यात भारताची कसोटी लागणार आहे.

### एक उल्लेखनीय उच्चांक

१९४५ मध्ये युरोपमधील दुसरे महायुद्ध संपले. त्यानंतरच्या ४३ वर्षांत युरोपच्या भूमीवर युद्ध झाले नाही. शांततेचा एवढा दीर्घ कालखंड युरोपने, त्याच्या ज्ञात इतिहासात, कधी अनुभवला नव्हता. ह्या अगोदरचा असा सर्वांत दीर्घ कालखंड म्हणजे १८७१ मध्ये फ्रेंच-जर्मन युद्ध आटोपल्यानंतर १९१४ मध्ये पहिल्या महायुद्धाला तोंड फुटेपर्यंतचा कालखंड.

युद्ध करणे हा युरोपिअन जीवनपद्धतीचा जवळजवळ भाग बनला होता. आणि युद्ध अधिक भयानक करण्यासाठी युरोपिअन बुद्धिमत्ता आणि कल्पकता खर्ची पडली आहे. ज्याला सर्वंकष युद्ध म्हणतात त्याचा शोध युरोपने लावला. क्लॉझेव्हिट्झने युद्धाचे तत्त्वज्ञान घडविले. ब्रिटिश कवींनी आपल्या करुण गीतांनी युद्धाला रोमँटिक रूप दिले.

शांततेचा इतका दीर्घ अनुभव घेण्याची सवय नसल्यामुळे अनेक युरोपिअनांना चुकल्याचुकल्यासारखे वाटतही असेल.



















मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

हे मासिक श्री. ग. दीक्षित यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून मे. पुं. रेगे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.